पॉप्युलर प्रकाशन : ४ :

प्रकाशक
गणेश रामराव भटकळ
पॉप्युलर बुक डेपो,
लॅमिंग्टन रोड, मुंबई ७

प्रथमावृत्ति
१-९-१९५३

मुखपृष्ठ
द. ग गोडसे

ती दादा आणि ती सौ माई

याचे चरणीं,

कृतज्ञतापूर्वक—

# निवेदन

'पख' ही माझी दुसरी कादबरी या कादबरीत एका नाट्यवेड्या कलदराची दुर्दैवी कहाणी सागण्याचा मी प्रयत्न केला आहे ही कहाणी एका वस्तुस्थितीवर उभी असल्याने, त्यातील पात्रें, प्रसग आणि वातावरण सर्वस्वी काल्पनिक आहेत, असें म्हणण्याच धाडस मी करू शकत नाही लेखक या नात्यानें, कलात्मक सत्याच्या आविष्कारासाठी आवश्यक तेवढाच मी मूळ कथेंत हस्तक्षेप केलेला आहे

या कथेंतील नायक ज्या दुर्धर रोगामुळ जन्मभर दग्धपक्ष जिण जगत असल्याच मी दर्शविलें आहें, त्या रोगाबद्दल सामान्य वाचकाना जिज्ञासा वाटण्याची शक्यता आहे म्हणून वैद्यकशास्त्रावरील काही अधिकृत ग्रथातून मी पुढील माहिती देत आहे या रोगाच नाव कोरिआ (Chorea) हा रोग जडल्यानें रोग्याचा मज्जा-ततूवरील ताबा ढिला होतो आणि त्यामुळेंच त्याच्या हातापायाची आणि मुद्रेची वेडीवाकडी हालचाल होऊ लागते म्हणूनच बहुधा या रोगास 'सेंट व्हाइटसेस् डान्स'

(*St Vitus' Dance*) असाहि दुसर नाव दिलें जात हा रोग सर्वसाधारणपण लहान मुलांना होतो आणि कालान्तरान तो बराहि होतो पण योग्य उपचाराच्या अभावी, काही रुग्णाइताच्या माग या रोगाचा जन्मभर ससेमिरा लागतो या रोगाच प्रमाण आपल्याकडे फार कमी आहे पण त्यामुळेंच ज्या थोडयांना तो जडतो त्याच्या जीवनाची या कथतल्या नायकाप्रमाण वाताहात होते.

वैद्यक शास्त्रावरील अधिकृत ग्रथात या रोगाची अशा व्याख्या केली आह का "*Chorea is a functional disorder of the nervous system, characterized by sudden, aimless, irregular, movements, often accompanied by muscular weakness and emotional instability* "

तसंच या रोगाची काही प्रमुख लक्षण पुढीलप्रमाण सागण्यात आलेली आहेत "*When fully developed, the movements of Chorea are quite unmistakable The abnormal muscular movements are first seen in the face, with disturbance of articulation and twitchings of the eye-muscles, which lead to facial grimaces In most cases the spasmodic movements soon extend to all parts of body—particularly to fingers They are irregular, jerking, never rhythmical, rarely symmetrical, and vary in intensity, from an occasional muscular contraction to almost constant motion The movements are only partly under the control of the patients' will, efforts to repress them may be momentarily successful, but they*

*presently burst out like a dammed-up flood They are increased by excitement, embarrassment, or fatigue "*

—अर्थात् या शास्त्रीय माहितीचा कस लावून मात्र रसिकांनी या कादंबरीचं मूल्यमापन करू नये शास्त्रीय ज्ञान हे कलेला नेहमीच उपकारक होत असलं, तरी कलाकृतीची बलस्थानं वेगळीच आहेत, हे सूज्ञ रसिकांना सांगावयास हवे असं नाही ही कहाणी सांगताना मी ज्या एका अनुभवानं व्यथितचित्त झालो होतो, तो अनुभव या कादंबरीच्या वाचनानं रसिकांच्या मनांत जागृत झाला, तर माझे प्रयत्न सफल झाले, असं मला वाटेल

हंसराज प्रागजी ठाकरसी कॉलेज,
नासिक
१ मार्च १९५३

**वसंत कानेटकर**

# १

सूर्य मावळतीच्या मार्गावर असतानाच गावाच्या दीड खणी रुंद हमरस्त्यातून पाडू मास्तर तरातरा चालले होते ते कसल्यातरी घाईत होते. आणि घाईपेक्षा कसल्या तरी धुंदीत होते तिऱ्हाईताला वाटावें, कीं हा इसम नशापाणी करूनच रस्त्यातून चालला आहे. पण गावकऱ्यानीं चुकून देखील असा सशय घेतला नसता. दोन वेळच्या जेवण्याची ज्याला भ्रांत, अशा शाळा मास्तरच्या जीवनात कुठून आले आहे नशापाणी? वेडा, खुळा म्हणून गावकऱ्यानी पाडू मास्तराची भरपूर चेष्टा केली असेल, आपल्या बावळटपणाने आणि विसरभोळेपणानें पाडू मास्तरानीं गावातल्या कच्च्याबच्च्याची भरपूर करमणूक केली असेल, पाडू मास्तराचा अजागळपणा पाहून पाण्यासाठीं नदीवर जाणाऱ्या बायाबापड्यादेखील अनेक वेळा तोंडाला पदर लावून फिदफिदल्या असतील, पण पाडू मास्तराच्या बाबतींत असला घाणेरडा आरोप त्याच्या शत्रूना देखील करता आला नसता. पण पाडू मास्तराना शत्रू होते कुठें? त्याचें शत्रुत्व कोण आणि कशासाठीं करणार? वैरभाव धरण्यासारखा त्याच्या अंगी कडवटपणा आणि कणखरपणा होता कुठें? पाडू मास्तर जगन्मित्र होते. थोर बायाबापड्यानींच नव्हे, तर कच्च्याबच्च्यांनीं देखील क्षुद्र कामासाठींहि त्याना राबवून घ्यावें, असे ते भोळ्या

दिलाचे होते. रस्त्यानें तरातरा चालण्याची ती त्याची एक लकबच होती. पावलोंपावलीं ते माणसाना टेचकाळत असत. आणि भेटलेल्या इसमानीं सांगितलेल्या कामगिरीनुसार त्याच्या पायपिटीची दिशा बदलत असे. त्याच्या चालण्यात अधीरेपणा, उतावळेपणा भरलेला असे पण पांडू मास्तराना कोणीं हटकलें आणि विचारलें—' काय मास्तर, कसल्या घाईत चाललात एवढे ? ' तर ब्रेक लागलेल्या मोटारप्रमाणें पांडू मास्तर ठेंचकाळून जागीच थबकत असत आणि मग, " घाई कसली ? म्हणजे त्याचं असं आहे ..." अशा शब्दानीं सुरुवात करून पांडू मास्तर आपल्या मनातल्या पागापाग झालेल्या बाजारबुणग्या विचाराची एकत्र मोट बांधू लागत या मोट बांधण्याच्या प्रयत्नात आपण निघालों होतों कशासाठीं, याचा त्याना उमज पडत नसे आणि मग कागदपत्राचा जुडगा घेऊन लगबगीनें जाणाऱ्या माणसाच्या हातातून वावटळीने कागदपत्रें इतस्ततः उडून विखरून जावींत, आणि ती आवरताना त्याची धावपळ व्हावी, तशी पांडू मास्तराची मुद्रा होत असे.

तरातरा चालताना मुक्कामाच्या आरंभीं आणि शेवटीं, पांडू मास्तराचे पाय व्यवहाराच्या जमिनीवर टेकलेले असत पण त्याचा चालण्याचा वेग वाढला, की ते अंतराळात भ्रमण करूं लागत त्याचें हें भ्रमण त्याच्या डोळ्यातूनच ओसंडूं लागें असें नव्हे, तर त्याच्या थरथरत्या ओठावर आणि कंप पावणाऱ्या हाताच्या बोटावरहि ते उमटू लागें. बोलताना पांडू मास्तराचे ओठ आगंतुकपणें फुरफुरत असत आणि त्याच्या हाताची बोटें अकारण वेडी वाकडीं कंपित होत असत बघणाऱ्याला वाटावें, की हा इसम रागाच्या भरात आपल्या मनातली दबलेली मळमळ आवेशपूर्ण आणि ओघवत्या भाषेंत फडाफडा बोलून दाखविणार ! पण तसें काहीं एक होत नसे पाय थकलेल्या माणसानें रेंगाळत चालावें तसा थकलेला आशय चाचपडत रेटारेटी करत त्याच्या मुखातून शब्दरूपानें बाहेर पडत असे. ओठाची आणि हाताच्या बोटाची बरीचशी हालचाल आणि मग एखादा शब्द अशा थाटात त्याचें बोलणें सुरू झालें, म्हणजे ऐकणाऱ्या माणसाला हसणें अगदी अनावर होई. स्थळ स्वयंपाक घर असो, वा रस्त्यावरचा एखादा चौक असो, पांडू मास्तर बोलताना ऐतिहासिक संभाजीच्या पवित्र्यात उभे राहून बोलत

असत. पण त्याचे पाय मात्र वाऱ्याने हालणाऱ्या सुरूच्या झाडाप्रमाणें गदगदा थरथरत असत. पाडू मास्तराचे डोळेहि भिऱ्या खारीप्रमाणें भिरभिरत असत त्याचा डावा डोळा नेहमीं लवत असे. त्यामुळें बोलणारा इसम तिऱ्हाईत असला, तर पाडू मास्तर आपल्याला वाकुल्या दाखवितो आहे किंवा काय, अशी त्याच्या मनात शका येऊन जाई पण पाडू मास्तराच्या या साऱ्या लकबींची गावकऱ्याना आता सवय झाली होती. पाडू मास्तर हातवारे करीत स्वतःशींच काही पुटपुटत रस्त्यातून चालूं लागले कीं ओळखीची माणसे, ह्या स्वारीच्या डोक्यात काहीं नवी कल्पना भिरभिरू लागल्याचे समजत, आणि गालातल्या गालात हसत असत

ओळखीच्या चेहऱ्याना, ठेंचकाळत, थबकत आणि प्रसन्नपणे स्वत.च्याच खुषींत वाटेला लावत, पाडू मास्तर असेच हमरस्त्यावरून आताहि चालत होते रस्त्याच्या टोकाला येऊन पोहोचल्यावर पाडू मास्तर थबकले. बावचळल्या मुद्रेनें ते आजूबाजूला सुगावा घेऊ लागले मग त्याच्या लक्षात आलें की रावसाहेबाचा वाडा ओलाडून आपण बरेच पुढें आलों आहोत पण त्याचें त्याना बिलकुल वैषम्य वाटले नाही. उलट दिशेनें तोंड फिरवून ते पुन्हा तरातरा चालू लागले रावसाहेबाच्या वाड्याशीं येऊन पोहोचताच त्यानीं आपली चाल आवरली वाड्याच्या दाराशीच एक गडी विडी फुकत बसला होता पाडू मास्तराना बघताच तो एकदम प्रसन्नपणें हसून म्हणाला—

"काय मास्तर, साजच इकड कुट झुकली स्वारी ?"

पाडू मास्तर हसले. प्रथम त्याचे ओठ फुरफुरले आणि मग त्याच्या बोटाची काहीं वेडी वाकडी चाळवाचाळव झाली "झुकलो म्हणजे रावसाहेबाच्याकडे काहीं काम होत. आहेत का साहेब घरात ?"

"साहेब हायती घरामधीं पर पाव्हन आल्याती शहराकडून, त्येंच्यासग बोलत बसल्याती"

या उत्तराबरोबर पाडू मास्तराची मुद्रा अधिकच बावचळल्यासारखी झाली. आता काय करावें ते त्याना समजेना "म्हणजे जरा महत्त्वाच्या कामासाठी रावसाहेबानी बोलावल होत मला..."

"अस व्हय ! मग जा वर. भेटत्याल तुमास्नी."

पाडू मास्तर दारातून आत जाऊ लागले. तेवढ्यात त्याना कसलीशी आठवण झाली. आणि मागें वळून ते म्हणाले—" तुमचा दमा काय म्हणतो बाबूराव ? "

" कसला दमा न् कसल काय ? जीव अश्शी नकोसा झालाय पगा. "

" अरे अरे ! मी सागितलेला उपाय तुम्ही केला नाहीत वाटत ? "

असें विचारीत पाडू मास्तर जिव्हाळ्याच्या स्वरात पतोजीप्रमाणें लिंबू-पाण्याचा उपाय त्याला समजावून देऊ लागले. मग त्याच्या बायकामुलाची त्यानीं चौकशी केली. आणि मग बोलायला काहीं उरले नाहीं, तेव्हा मास्तराची स्वारी दिवाणखान्याकडे झुकली. पाडू मास्तर जिना चढत असतानाच वरून सात मजली हास्याचे फवारे त्याच्या कानीं पडले. त्याबरोबर पाडू मास्तर दचकले. अकारण भेदरले. आणि गडबडून दोन पायऱ्या खालीं आले. असे खदखदून फिदफिदून कोणी हसले म्हणजे पाडू मास्तराना शरमल्यासारखे होई. जणू हसणारे लोक आपल्यालाच हसताहेत असें त्याना वाटू लागे, आणि घाबरलेल्या सशाप्रमाणें त्याची केविलवाणी अवस्था होई. पाडू मास्तर खालीं आले. तेवढ्यात मालकीणबाईनीं स्वयपाक-घरातून बाबूला हाक मारल्याचे त्यानी ऐकले. बाबू धावत पळत आंत गेला आणि चहाच्या कपाचा ट्रे घेऊन परत आला. तो जिन्यापाशी येत आहे तोंच मालकीणबाईनीं पुन्हा एकदा त्याला पुकारले. त्याबरोबर समयसूचकता दर्शवून पाडू मास्तरानी बाबूच्या हातातला ट्रे आपल्या हातात घेतला आणि त्याला जाण्यास खुणावले बाबू निघून गेला आणि पाडू मास्तर दबकत दबकत जिन्यांतून ट्रे घेऊन वर दिवाणखान्यात आले.

दिवाणखान्यात रावसाहेब लोडाला टेकून बसले होते. त्याच्या भोवती पाच सहा माणसाचा घोळका अदबीनें बसला होता त्यातील काहीं प्रौढ होते आणि काहीं तरुण होते. प्रौढाच्या मुद्रेवर सभावितपणा आणि तरुणांच्या मुद्रेवर उतावळेपणा उमटला होता. रावसाहेब खुषींत त्याच्याशीं बातचीत करीत होते. पाडू मास्तर जिन्यातून शेवटच्या काहीं पायऱ्या वर चढून येत असतानाच कोणी एक संभावित इसम मोठ्या जिव्हाळ्यानें म्हणत होता—

'. तें काहीं खरें नाहीं रावसाहेब ! उत्सवाचें स्वागताध्यक्षपद आपणच स्वीकारले पाहिजे."

त्यावर त्याच्या शेजारी बसलेला एक तरूण खादीवेषधारी इसम अकारण अधीरपणानें म्हणत होता—" . म्हणजे काय, प्रश्नच नाही ! आपल्या संमतिशिवाय आम्ही मुळीं येथून हालणारच नाहीं ! आपण नाहीं म्हटले, तर आम्हा सर्वांची फार निराशा होणार आहे . "

हे उद्‌गार ऐकून रावसाहेब अंतर्यामीं खूष होत होते. पण मुद्रेवर अकारण अवघडलेला भाव आणून त्यांनी आढेवेढे घेण्यास आरंभ केला. मग कोणीतरी रावसाहेबांच्या या विषयातील अधिकाराचा उल्लेख करून त्यांच्या काळजालाच हात घातला 'त्याबरोबर रावसाहेबांच्या मुद्रेवरील संभावितपणाची सावधगिरी विरघळून गेली, आणि ते लाजत लाजत म्हणाले,—

"तुम्ही म्हणता, तें कांही खोट नाही ! गेलीं चाळीस वर्षे नाट्य-व्यवसायातील साऱ्या उलाढाली मी अगदीं जवळून पाहत आलो आहे. आपले नारायणराव, गोविंदराव, बळवंतराव हीं सारीं माणसें आमच्या अगदीं रोजच्या बैठकींतली. नारायणरावांना तर कैक प्रसंगी अडल्या नडल्या वेळी आम्ही सावकार मिळवून दिले होते. माणूस मोठा लाख मोलाचा ! व्यवहाराला जरा ढिला. पण कला म्हणजे काय महाराज ! ..."

आणि रावसाहेब असेच काहीसे पुष्कळ बोलत राहिले असते. पण तेवढ्यात त्यांची नजर दाराकडे गेली आणि त्यांनी पाडू मास्तराकडे पाहिलें. त्याबरोबर रावसाहेबांची मुद्रा एकाएकीं बदलली त्यांच्या झुपकेदार, करड्या मिशांच्या आड दडलेले त्यांचे ओठ अपशब्दाने फुरफुरू लागले. त्यांच्या भुवया वक्र झाल्या आणि कपाळावर एकदोन आठ्याहि उमटल्या. पाडू मास्तरांनी रावसाहेबांच्या मुद्रेवरील हा बदल बारकाईनें न्याहाळला आणि त्यांची मुद्रा घाबरीघुबरी व लाचार झाली. पाडू मास्तर घाबरे-घुबरे झाले की त्यांचे हात थरथर कापू लागत आणि बोटांची वेडीवाकडी चाळवाचाळव होऊ लागे. त्यामुळें त्यांच्या हातातील चहाचा ट्रे थोडासा हिंदकळला देखील. रावसाहेब पाडू मास्तरांना उद्देशून म्हणाले—"या पाडोबा, एकूण सवड झाली म्हणायची तुम्हांला ! "

या उपरोधाच्या उद्गारानीं पाडू मास्तराची मुद्रा अधिकच शरमिंदी झाली. ट्रेमधला एक एक कप बैठकीतल्या माणसाच्या हाती देत असताना पाडू मास्तराचे ओठ प्रथम फुरफुरले, आणि मग केविलवाण्या स्वरात मास्तर म्हणाले,—" छे, छे, अस कस म्हणता साहेब! आपला निरोप कळला तस्सा मी धावत आलों" अस काहीस पुटपुटून ते आत्मसमर्थन करू लागले

त्याबरोबर रावसाहेब खेकसले—" काय म्हणालास? दोन दिवसापूर्वी तुला मी निरोप पाठविला होता, अन् आज तू उगवतो आहेस? काल सध्याकाळीं छबीच्या लग्नाच प्रयोजन होत, माहित होत कीं नाही तुला?"

पाडू मास्तराचे पाय थरथर कापू लागले हाताची अधिकच वेडीवाकडी हालचाल होऊ लागली आणि ओठावाटे कसे बसे " होय.. होय ." असे शब्द फुरफुरत बाहेर पडले

" मग? कुठ उधळली होती आपली स्वारी? गेला असशील कुणाची तरी नाटक सजवायला! हजार वेळा तुला सागितल, की घरी कुणी पाहुणे माणसं आलीं म्हणजे वाढा-सवरायला येत जा म्हणून! शिदोरे मास्तर आले होते, गुरव मास्तर आले होते, त्या एक नबरच्या शाळेचे हेडमास्तर सुद्धा आले होते. पण तुझा पत्ता कुठाय?"

" त्याच असं आहे रावसाहेब—" तपकिरीची चिमूट नाकात कोंबीत रावसाहेबाच्या शेजारी बसलेले एक तरुण सभावित म्हणतात—" तुम्ही या लोकल बोर्डाच्या शाळेतल्या मास्तराना फारच शेफारून ठेवल आहे"

" नाहीं तर काय?" तबाखूचा बार भरीत त्याचे दुसरे एक पगडीवाले शेजारी म्हणतात—" अहो, ते पूर्वीचे गणपुले रावसाहेब चेअरमन होते, तेव्हा म्हशीच्या धारा काढण्यापासून अथरूणें घालण्यापर्यंत साऱ्या मास्तराना घरीं कामाचे वारच नेमून दिले होते आता तो काळहि गेला अन् तसली माणसेहि गेली!"

" बाकी रावसाहेब, हा पाडू मास्तर तुम्हीं खूप अजब शोधून काढलात बुवा!"—तपकीरबहाद्दर एक भली मोठी शिंक देऊन म्हणतात—" लेकाचा ड्रॉइंग मास्तर म्हणवतो, पण फळ्यावर नीट ठोकळा तरी काढता

येतो कीं नाही कोणास ठाऊक ! ''

" अहो तें कशाला—आमचा बाबू म्हणत होता कीं, या मास्तरला सरळ रेघा ओढायला पधरा मिनिटें लागतात ! ''

त्याबरोबर बैठकीत प्रचड हास्याचे फवारे उसळले पाडू मास्तरावर सर्वांच्या नजरा रोखल्या गेल्या. सारीं माणसें आपल्याकडे रोखून पाहताहेत याची जाणीव होताच पाडू मास्तराची मुद्रा अधिकच लाचार झाली आणि त्याच्या हाताचीं बोटें जास्तच वेडावाकडा चाळा करू लागली

" असल्या शिक्षकाना शिक्षणसंस्थेंत बिलकूल थारा देता कामा नये . . '' अशा वाक्यानें किरट्या स्वरात आरंभ करून एक तरुण ध्येय-वादी गृहस्थ आधुनिक शिक्षणावर लाबलचक व्याख्यान देऊं पहात होता पण तेवढ्यात रावसाहेबानीं खाकरून खोकरून त्याला गप्प केलें. मग रावसाहेब म्हणाले—

—" ह्याला ठेवलाय् म्हणजे तरी काय, ह्याची ही नोकरी गेली तर हा अगदी उघडा पडेल बायका पोरें उपाशीं मरतील. म्हणून ह्याला ठेवून घेतलाय् झालं ! नाहींतर शाळेंत याच्या कामाचे काय दिवे लागताहेत, हें दिसतच आहे . . ''

मग रावसाहेबानीं पाडू मास्तराची खूप हजेरी घेतली पण त्याच्या स्वरातला पूर्वीचा करडेपणा नाहींसा झाला होता. आणि त्याचे रागीट शब्दहि भूतदयेने भिजले होते ते ऐकताना पाडू मास्तराना जरा हायसें वाटलें. शाळेंतल्या कामाबद्दल रावसाहेबाच्या तोंडून आपली सडकून निर्भत्सना ऐकण्याची पाडू मास्तराना चागलीच सवय झाली होती म्हणून जागच्या जागीं मान खालीं घालून चुळबुळ करीत ते उभे होते मग रावसाहेबाच्या विषयाचा ओघ बदलला आणि नाट्यमहोत्सवाच्या कार्यकर्त्योंशी ते दिल-खुलासपणे बोलू लागले. त्या बोलण्यामध्ये पाडू मास्तराना एरवीं काही स्वारस्य वाटण्याचे कारण नव्हतें रावसाहेबाच्या घरीं पाऊल टाकल्यानतर पाडू मास्तराशीं रावसाहेब मधून मधून बोलत असत. आणि बाकीच्या वेळात ते इतर काही फावल्या वेळची कामें करीत असत वा अन्य कोणाशीं सभाषण आरंभीत असत. पाडू मास्तर दाराशी वा खाबाशीं तिष्ठत उभे

राहिले आहेत, हें त्याना दिसत असें. पण त्याची त्याना विशेष दरकार वाटत नव्हती. मास्तरानीं असेंच तिष्ठत उभे रहावें असें त्याना मनापासून वाटत असें. दुसऱ्या माणसाशीं सभाषण करता करता विषय संपला म्हणजे मध्येंच पांडू मास्तराकडे वळून कधीं रागानें तर कधी रंगात येऊन ते म्हणत असत—" मग काय पांडोबा, कस होणार तुमच ? अं ? "

अशा वेळी पांडू मास्तरानीं लाचारीनें हंसावें आणि मग रावसाहेबांनीं किंचित् हसत—" हसता काय ! मी आहे तोंवर नाहीं डोळे उघडायचे तुमचे...... " असे काहींसें म्हणू लागावें नाट्यमहोत्सवाच्या कार्यकर्त्यांशीं बातचीत करीत असताना रावसाहेब मधून मधून असेच पांडू मास्तराना तोंडी लावत जुने विषय चघळू लागले. मग संधि साधून, रावसाहेब गदगदून हंसताहेत असा खुषीचा मोका पाहून पांडू मास्तर हळूच म्हणाले—" आपल्याकडे एक काम होत.. ..."

रावसाहेबानी एकदम हसणें थांबविले आणि भुवया वक्र करून कपाळाला आठ्या घालून मास्तराकडे पाहिलें त्याबरोबर पांडू मास्तराची त्रेधा तीरपिट उडाली

" काम म्हणजे तसें विशेष नव्हते ! आपलें साधेंच काहींतरी.. .. "

" साधेंच काहींतरी ? "

" उद्याच्या दिवसाची रजा विचारायला आलों होतो मी."

" रजा ? कसली रजा ? कुणाचे ताबूत बांधायला जायचें आहे ? "

त्याबरोबर पुन्हा एकदा बैठकीत हास्याचा कल्लोळ उडाला.

पांडू मास्तर भीत भीत म्हणाले,—" म्हणजे, कृष्णाबाईच्या उत्सवासाठी.. .. "

" समजलं, समजल ! आणि उद्या तुझा बाप तो दिपोटी शाळा तपासायला येणार आहे, त्याची काय वाट ? आधीच तुझ्या नावान हेड मास्तर ठणाणा करताहेत. आणि त्यात तूं उत्सव साजरे करायला जा ! नाटक बिटक असेल तिथं एखाद ! त्याशिवाय तू तिथ कसला जातो आहेस ? होय ना ? "

पांडू मास्तर हॅं हॅं करून लाचारीने हसले.

" पाडोबा, तूं एखाद्या राजाच्या पोटीं जन्माला यायला हवा होतास बघ ! म्हणजे हा नाटकाचा शोक तुला परवडला असता आणि शोभलाहि असता "

" म्हणजे " परगावचे एक तरुण कार्यकर्ते विस्मयानें विचारतात— " मेक-अप् आर्टिस्ट म्हणून ज्याच नाव आम्ही ऐकतो ते पाडू मास्तर हेच की काय ? "

" होय, हीच ती स्वारी ! आर्टिस्ट कसला दगडाचा ! बरे रगवितो चेहरे झाल पण तुमच्या उत्सवाच्या नाटकान्च्या वेळीं चागल करील हो काम हा तसा मोठा कष्टाळू आहे पण डोक्यान जरा ढिला आहे—" रावसाहेब खदखदून हसत म्हणाले—" नाटकाचा शोक तर असा जबर-दस्त आहे म्हणता की, मोठमोठया राजेरजवाड्यानीं याला मानाचा मुजरा ठोकावा अक्कल नाहीं कवडीची आणि थाटमाट एखाद्या कलावंताचा.. " आणि मग रावसाहेब पुन्हा एकदा उत्सवाच्या कार्यकर्त्याशीं दुसऱ्या एका विषयावर बोलू लागले पाडू मास्तर मग बराच वेळ तिष्ठत चुळबुळ करीत उभे राहिले. बोलताना रावसाहेब केव्हातरी गदगदून हसले, ती संधि साधून पाडू मास्तर हळूच अजीजीने म्हणाले—

" मग रावसाहेब.. ..."

त्याबरोबर रावसाहेब एकदम भडकून ओरडले,

" रावसाहेब काय डोंबल तुझ ! एकदा सागितलेल समजत नाहीं ? रजा मिळायची नाहीं जा, माझं डोकं पिकवूं नकोस उगीच. "

पाडू मास्तर निराश झाले आणि माघारीं जाण्यासाठी जिन्याकडे वळले. तेवढ्यात कसलीशी आठवण होऊन रावसाहेब म्हणाले—

" हे बघा पाडोबा, शाळेंतल्या पोराना चार दोन धडे शिकवा आता निदान अक्षर तरी गिरवून घ्या त्याच्याकडून डिपार्टमेंटमध्यें बोंब झालीय तुमच्याबद्दल. नाटक अन् तमाशे आता पुरे झाले, समजल का ? "

पाडू मास्तरानीं निर्बुद्धपणें मान हालविली आणि ते जिन्यातून खालीं येऊ लागले. जिन्याच्या चारदोन पायऱ्या उतरून पाडू मास्तर तिथेंच थबकले. कान टंवकारून दिवाणखान्यातलें संभाषण ते ऐकूं लागले. रावसाहेब

जुन्या काळातल्या नाटकाच्या आणि नटाच्या आठवणी घोळ घोळून सागू लागले ते ऐकण्याचा पाडू मास्तराना जबरदस्त मोह पडला होता. वास्तविक रावसाहेबानी खरपूस तबी दिल्यानतर, पडलेल्या चेहऱ्यानें आणि सथ पावलानें पाडू मास्तर नशिबाला बोल लावीत त्याच्या घरातून बाहेर पडत असत पण पाडू मास्तराची कानउघाडणी करीत असताना, रावसाहेब आलेल्या पाहुण्याशी ज्याबाबत बोलत होते, ते ऐकल्यावर पाडू मास्तराचें अगदी देहभान हरपल्यासारखें झालें रावसाहेबानीं वाटल्यास अशीच आणखी अर्धा पाऊण तास आपली कानउघाडणी करावी पण आपल्याला दिवाणखान्यातल्या खाबापाशीं तिष्ठत उभे करून तें बोलणे ऐकूं द्यावें, असे त्याना वाटत होतें. पण रावसाहेबानीं निरोप दिल्यानंतर त्याचा नाईलाज झाला. मध्येंच त्याच्या ओठावर शब्द देखील आले होते ते रावसाहेबाना म्हणणार होते कीं यावेळीं आपण नाही म्हणूं नये मडळीचा आग्रह आहे म्हणूनच नव्हे, तर आपल्यासारखा लायक स्वागताध्यक्ष खरोखर उत्सवाला मिळणार नाहीं. पण रावसाहेबाशीं अशा सलगीने बोलणे त्याना झेंपण्यासारखें नव्हतें म्हणून पाडू मास्तर मुकाट माघारीं परत फिरले होते जिन्यातूनच त्यानीं ऐकलें, की पाहुण्यामडळीपैकीं कोणी मुद्याचा विषय पुन्हा उकरून काढला आणि म्हटलें—

" मग काय रावसाहेब, आपली समति आहे अस समजायच आम्ही ?"

पाडू मास्तरानीं उचबळून येऊन जिन्यातच मान डोलावली आणि स्वतःशीं होय म्हटलें आणि त्या खुषीत पाडू मास्तर खाली आले. तेवढ्यात आतून बाईसाहेब कडेवर रडणारें एक पोर घेऊन चिडचिडत बाहेर आल्या पाडू मास्तर त्याना पाहताच हर्षाने त्याना नमस्कार करून म्हणाले—

" कळल का वहिनीसाहेब ? रावसाहेब नाट्यमहोत्सवाचे स्वागताध्यक्ष झाले. आता शहरामध्ये नाटकच नाटक होणार ! नारायणराव, गोविंदराव, गणपतराव सारी मडळी येणार आणि बरं का वहिनीसाहेब, नाटकाच्या वेळी पात्र रगवायच काम रावसाहेबानीं माझ्याकड दिलय ! "

बाईसाहेबाचे पाडू मास्तराच्या बोलण्याकडे लक्षच नव्हते त्याच्या कडेवर असलेल्या पोराने हातपाय झाडीत आकात माडला होता

' बरं झालं मास्तर तुम्ही आलात. घ्या जरा याला, आणि थोडा हिंडवून आणा उच्छाद माडलाय् कारस्थान ! जीव नकोसा केलाय् अगदीं !''

पाडू मास्तराना पाहताच त्या पोराचें रडणें थाबले. आणि तो त्याच्याकडे झेप घेऊ लागला पाडू मास्तरानीं प्रसन्नपणें हसून त्याला आपल्या कडेवर घेतला, आणि ते बाहेर आले. तऱ्हेतऱ्हेच्या वाकुल्या दाखवून ते त्याला खदखदा हसवू लागले तेवढ्यात कुठल्याशा कामागिरीवरून बाबू घरी परतला. मास्तर गडबडीनें त्याला वाटेतच अडवीत म्हणाले—

" कळल का बाबूराव तुम्हाला ? शहरात आता नाट्यमहोत्सव व्हायचा आहे रावसाहेब स्वागताध्यक्ष झाले "

बाबूरावानी बावचळल्यासारखी मुद्रा केली त्याना वाटले, रावसाहेबाना बढती मिळाली

" मग रावसाहेबाचा पगारबी वाढला असल, नव्ह का ? "

पाडू मास्तर त्यावर मन.पूर्वक हसले तेवढ्यात बाईच बाहेर आल्या. आणि बाबूवर खेंकसून म्हणाल्या—

" कसल्या रे मेल्या चकाट्या पिटत बसला आहेस ? रेशन आणलस का ? "

" हा आताच घेऊन येतो नव्ह का बाईसाहेब. " आणि बाबू रेशनच्या पिशव्या घेऊन आत पळाला. मग बाईसाहेबानीं उदार अत.करणाने मास्तराच्या कडेवर हसणाऱ्या मुलाला आपल्याजवळ घेऊन त्याना मुक्त केलें आणि पाडू मास्तर पुन्हा एकदा कसल्याशा धुदींत तरातरा चालू लागले वाटेत अनेक लहानथोर ओळखीचे चेहरे भेटले पाडू मास्तराची दुडकी चाल पाहून त्या चेहऱ्यावर हास्य झळकले छोट्या पोरासोरानी मास्तराना नमस्कार केला आणि मोठ्या चेहऱ्यानी मास्तराचा नमस्कार घेतला भेटलेल्या प्रत्येक माणसाला आणि पोराला मास्तरानी मुद्दाम थाबविलें, आणि नाट्यमहोत्सवाची बातमी ऐकविली शिवाय रावसाहेब स्वागताध्यक्ष झाल्याची आणि स्वतःकडे नाटकातल्या पात्राना रगविण्याची जबाबदारी आल्याचेंहि ते सागण्यास विसरले नाहींत. तालमीत जाणाऱ्या बालगोपाळाच्या एका जथ्याला त्यानीं हे वृत्त ऐकवलें त्याचा अर्थबोध त्याना काहीं झाला की

नाहीं कोण जाणे ! पोराना इतकेंच कळलें कीं आता नाटकें होणार आणि खूप गमत जमत पहायला मिळणार ! मोतीमल मारवाड्याच्या किराणा मालाच्या दुकानावरून जाताना पाडू मास्तर दुकानात मुद्दाम डोकावले आणि त्यानी शेटजींना ही बातमी सुनावली. शेटजींचा आणि नाटकाचा सबध उभ्या हयातींत नाटकाचे पडदे गहाण ठेऊन घेण्यापर्यंतच आला होता त्यामुळे मास्तराच्या कानाशीं लागून शेटजी हलकेंच म्हणाले—

" मग मास्तर, इथें पाहुणे बिहुणे खूप जमायचे असतील ? "

" म्हणजे काय विचारण झाल ! अहो, हजारों लोकाची रीघ लागेल !"

" अस्स, " शेटजींची मुद्रा अधिकच गभीर झाली आणि पुन्हा ते हलकेंच म्हणाले—" मग आपल काहीं धान्य धुन्य . म्हणजे . गहू, तादूळ वगैरे काहीं लागल तर आम्हाला मिळायला हव हे काम ! "

पाडू मास्तरानीहि व्यवस्थापकाच्या थाटात मान डोलीवली आणि ते पुढे सटकले जाताना वाटेत बाळूकाका वैद्याचे घर लागले पाडू मास्तरानीं घरात डोकावून विचारल—" आहेत का बाळूकाका घरात ? "

त्याबरोबर माजघरातून खोकत पचा नेसलेला आणि अगात बाराबदी घातलेला एक म्हातारा बाहेर आला. मास्तराना पाहताच बाळूकाका म्हणाले—

" काय म्हणते तुझी प्रकृति पाडोबा ? मात्राचे वळसे घेतोस की नाही ? जागरण बिगरण करीत जाऊ नकोस हो फार ! म्हणजे त्याचे काय आहे.. "

...तेवढ्यात बाळूकाकाना खोकल्याची उबळ आली आणि ती सधि साधून पाडू मास्तरानीं नाट्यमहोत्सवाची बातमी बाळूकाकाना ऐकविली बाळूकाकानीं चेहरा वेडावाकडा करून म्हटलें—" पण पाडोबा, तूं या नाटकाच्या फदाफिंदात पडू नकोस ! तुझे हातपाय नाहींत धड ! आणि शिवाय ही नाटक मडळी म्हणजे—म्हणजे त्याचं काय आहे "

बाळूकाकाना पुन्हा एकदा खोकल्याची उबळ आली आणि ती सधि साधून पाडू मास्तर त्याचा निरोप घेऊन बाहेर पडले एव्हापावेतों रस्त्यावर चागलाच अधार पडला होता आणि दुकानाच्या फळ्याहि हळू हळू लागूं लागल्या होत्या. तेवढ्यात पाडू मास्तराना कसलीशी आठवण झाली. कृष्णाबाईच्या उत्सवाच्या पोरानीं नाटकाचा पडदा मोतीमल मारवाड्याकडून

सकाळीं नेला बुरुडाकडून वासे आणि दोरहि नेले. पण बेस्याना पडद्याला लावायची रीळें नेण्याची काही आठवण झाली नसेल. हा विचार मनात डोकावल्याबरोबर, घरातलें कार्य निर्विघ्नपणे पार पडलें कीं नाहीं या काळजीनें वधूपित्याची मुद्रा चिंतातुर व्हावी तशी पाडू मास्तराची मुद्रा झाली. मग घाईघाईनें पाडू मास्तर आपल्या ओळखीच्या एका शिंप्याकडे गेले. मोठ्या अजिजीने त्याची विनवणी करून त्याच्याकडून पाडू मास्तरानीं काहीं रिकामीं रीळें मिळवलीं आणि आपल्या 'पिशवी झालेल्या' कोटाच्या बाहेरच्या खिशात कोंबली असे करताना त्यानी गणू शिंप्यालाहि नाट्यमहोत्सवाची बातमी ऐकविली गणू शिप्यानें मोठी थोरली जाभई देत म्हटलें- -

"मास्तर आमच पोरगं यंदा परीक्षेत पास झालं पाहिजे. सागून ठेवतों"

मास्तरानीं मान डोलविली आणि ते घराकडे वळले एका अंधेऱ्या गल्लींत एका पडक्या वाड्यात दुसऱ्या मजल्यावरच मास्तराचें बिऱ्हाड होतें. जिना चढून मास्तर आपल्या बिऱ्हाडापाशीं आले आणि त्यानीं दारावर कडी वाजविली. त्याबरोबर दुडुदुडु धावत येणाऱ्या पावलाचा आवाज त्याच्या कानीं आला पाठोपाठ 'थाब, थाब, अशी धावू नकोस' असे शब्द त्याच्या कानीं पडले. मास्तराच्या पत्नीनें दार उघडलें आणि त्याना पाहताच ती सुटकेचा निश्वास टाकून म्हणाली—

"आलात? देव पावला! माणसाच्या जीवाला काळजी लावून कुठ कुठं हिडत बसता, ते तुमच्या जीवालाच माहित!"

"बाबा मला काय आणलत?" सात आठ वर्षांच्या जाईनें मास्तराच्या पायाला विळखा घालीत विचारलें. तिला कडेवर घेत मास्तरानीं आपल्या बायकोला म्हटल—

"अग, कुठं म्हणून काय विचारतेस—आता नाट्यमहोत्सव व्हायचा ना इथ" आणि मग मास्तरानीं ती बातमी रसभरीतपणे आपल्या बायकोला ऐकविली ते ऐकून त्याच्या पत्नीच्या चेहऱ्यावर काळजीची छटा उमटली. तावातावानें ती म्हणाली—

"मग तुमच्या अगात आताच वार भरलेल दिसतंय नाटकाच? कोण मेलीं नाटकी माणस येताहेत, ती बघू देत तर मला! केरसुणीनें झोडपतें

एकेकाला"......अस म्हणून ती बाई तणतणत स्वयपाकघरात गेली. नाटकाच्या माणसाना शिव्याशाप देत दाणकन् एक थाळी आपटत तिनें मास्तराच्या जेवण्याची तयारी केली, आणि मग मास्तरानीं, वरिष्ठानीं तोंडमुख घेतल्यानतर एखाद्या कारकुनाने हिंपुटल्यासारखे होऊन कागदपत्रात तोंड खुपसून बसावे, तशी मुद्रा केली आणि ते पानात तोंड घालून जेवू लागले तेवढ्यात छोटी जाई दुडदुड धावत आली आणि ती मास्तराच्या मांडीवर बसली मास्तराच्या पानातले पदार्थ त्याच्या मांडीवर बसून लाडानें मागून घेऊन खाणें, हा तिचा रोजचा हक्कच होता अशा वेळी बाप लेकींचे मायेचे कढ अगदी उतू जात असत आपल्या पानातले निम्मेंशिम्में अन्न पोरीला भरविण्यात आणि उरलेला वेळ चार दोन घास पोटात ढकलता ढकलता मुलीला गोष्टी सागण्यात मास्तराचा जात असे ते पाहून बयोला मनातून भारी सुख होई पण पाडू मास्तराच्यावर बयोची विरोधी भक्ति होती. त्यामुळें ती असलें सुख देखील रागावण्याचें जलाल तिखट मिसळून सेवीत असे आपल्या पोरीला तिच्या बापानें लाडावून ठेवले असल्याची तिची लाडकी तक्रार बयो अशा वेळी तणतणत मांडत असे पानावर बसल्यावर देखील मास्तराचे जेवण्याखाण्यात लक्ष नाही, हें तिच्या तत्काळ लक्षात येत असे आणि मग मास्तराच्या नाटकमंडळ्या, नाटकें, आणि नट याचा, इतिहाससुद्धा उद्धार व्हायचा

मास्तरानी केलेली कुठलीच गोष्ट बयोच्या पसतीला येत नसे प्रत्येक बाबतींत आपला वरचष्मा ठेवून मास्तराच्यावर उपकार केल्यागत ती त्याच्याशी वागे आणि मास्तरहि फार दिवस कर्ज न फेडता आल्यासारख्या ऋणकोच्या अजिजीने तिच्याशीं वागत मास्तराच्या लग्नाला आता दहा वर्षे उलटून गेलीं होती. लग्नाच्या वेळीं मास्तर विशीच्या आसपास असतील. फायनलची परीक्षा कसे बसे पास होऊन लोकल बोर्डाच्या दोन नबरच्या शाळेत ड्रॉईंग मास्तर म्हणून त्यावेळीं ते लागले होते मास्तराचे कापरे हातपाय आणि फुरफुरे ओठ यामुळे त्याना मुलगी कोण देणार? शेवटी अशाच एका अडलेल्या माणसाची मुलगी रावसाहेबाच्या मध्यस्थीनें पाडू मास्तराच्या गळ्यात पडली आणि मास्तर एकदाचे उजवले गेले. पण

त्याचा परिणाम असा झाला कीं मास्तराशीं लग्न करून आपण त्याचा उद्धार केला आहे, अशी बयोची प्रामाणिक कल्पना झाली होती. आज गेलीं दहा वर्षे 'आता उरलो उपकारापुरता' अशा थाटात ती मास्तराचा संसार मोठ्या जहाबाजपणानें करीत होती. आजूबाजूच्या पंचक्रोशींत तिचा दरारा मोठा विलक्षण असे पोरेंबाळे तर तिला दबकून असत, पण आळीतल्या बायकाहि कुणी तिच्या तोंडी लागत नसत वाण्याचें असो वा शिंप्याचें असो, तिचें काम ताबडतोब होत असे इतका त्यानाहि तिचा वचक बसला होता. पाडू मास्तर तर तिला भिऊन असतच पण पाडू मास्तराचे दोस्तहि तिला घाबरत असत पाडू मास्तराच्या घरीं यायच्यापूर्वी बयो घरात आहे किंवा नाहीं, याचा सुगावा घेऊन मगच ते येत असत.

पाडू मास्तराचे जेवण चाललें होतें त्याच्या मांडीवर बसून घास खाणाऱ्या जाईला एकदम कसलीशी आठवण झाली आणि ती एकदम टुणकन् उडी मारून उठली. आणि वडिलांचे खांदे गदगदा हलवीत म्हणाली—" बाबा, तुला एक गमत सांगू का ? "

पाडू मास्तर प्रश्नार्थक मुद्रेनें हातातला घास तसाच ठेवून जाईकडे पाहू लागले.

" आमच्या शाळेत आता नाटक होणार आहे, आणि मी काम करणार त्यात "

" ऐका, ऐका लाडक्या लेकीची मुक्ताफळ. " थापलेली भाकरी तव्यावर आपटता आपटता बयो ठसक्यात म्हणाली.

" अगं, पण बिघडल काय ? "— शातपणे मास्तर म्हणाले. " हू काय म्हणतेस ? कसच नाटक आहे साग पाहू ? "

" बाबा, आमच्या बाईच म्हणाल्या की तू काम चागलं करशील म्हणून. बाईनीं सागितलेल ऐकल पाहिजे कीं नाहीं हो ? "

" होय. आपण ऐकलच पाहिजे पण बाईना कस कळल तू काम चागल करशील म्हणून ? "

" मी नाहीं सागत. ती आमची आपली गमत आहे ! "

" अग लबाडे ! मला नाहीं सागणार ? मग आम्ही बोलणार नाहीं

एका माणसाशीं. शेवतीची वेणी कधी आणणार नाहीं मग—"

"सागणार काय कपाळ?" बयो रागीटपणाने आपल्या पोरीचं कौतुक सागू लागली—"अभ्यासाच नाव नाहीं पण नाटकातलीं भाषण पहा कशी चुरुचुरु बोलते. हिच्या बाई सागत होत्या की ही बाहेर खेळायला यायची तेव्हा आत नाटकाच्या तालमी चाललेल्या असत नुसत ऐकून ऐकून पोरीचं सबंध नाटक पाठ झाल साग आता, मोठेपणीं पोरगी ससार करणार का नाटक करणार?" अस म्हणून तव्यावरची भाकरी तिनें चुलीला लावली

जाई म्हणाली—"आणि किनई बाबा, ती भक्त प्रल्हादच काम करणारी मुलगी होती ना, तिचीं भाषण मी चागलीं म्हणून दाखविलीं म्हणून बाईनी मला नाटकात घेतल. तुम्हाला दाखवू म्हणून?" अस म्हणून जाईनें भक्त प्रल्हादचा अभिनय करीत घडाघडा सभाषण म्हणून दाखविण्याचा सपाटा सुरु केला पाडू मास्तर चकित होऊन तिच्याकडे पाहतच राहिले. त्याच्या हातातला घास तसाच राहिला. जाईनें भाषण म्हणण्याचा जो सपाटा सुरू केला तो त्या नाटकाचा सबध अक तिने आपल्या आईबापाना ऐकवला. आपल्या पोरीला अभिनयाचे इतके सुदर धडे कोणी दिले असावेत, याचा मास्तराच्या मनात विचार चालला होता. मास्तर आपल्या मुलीकडे टक लावून पाहत होते पाहता पाहता त्याची दृष्टि भूतकाळावरून घरगळत वीस पचवीस वर्षामागें गेली, आणि त्याना आठ वर्षांचा पाडू—बालध्रुवाचीं भाषणें घडाघडा म्हणून दाखविणारा पाडू—दिसू लागला.

......आब्याच्या झाडाखालीं, रणरणणाऱ्या उन्हात पोराचे एक टोळके कैऱ्या खात बसलें आहे पाडू त्याच्यासमोर कसल्यातरी अमर्याद उल्हासानें आणि उत्साहानें गावात आलेल्या नाटक कपनीची आणि त्याच्या नाटकाची माहिती देत आहे. चोरून मारून तबूला पडलेल्या भोकशामधून आपण पाहिलेल्या नाटकाची हकीगत त्याना तो सागतो आहे आणि सागता सांगता नाटकातल्या पात्राच्या नकला तो सहीसही वठवून दाखवीत आहे. समोरच्या इमारतीच्या सज्जातून दोन शोधक डोळे पाडूच्या उत्साहावर

आणि अभिनयावर खिळले आहेत. कांहीं वेळानें त्या इमारतीतून कोणी एक चाकर बाहेर येतो आणि पाडूला आपल्या मालकानी बोलावलें असल्याचें सागतो नाटक कपनीच्या मालकानी आपल्याला बोलावलें, तें बहुधा नाटकाच्या वेळी तबूच्या भोकशातून आपण आत प्रवेश करून घेतला त्याबद्दल शिक्षा करण्यासाठींच असलें पाहिजे, अशा कल्पनेनें पाडूची पाचावर धारण बसते. पाडूचे दोस्त बघता बघता पळ काढतात. पाडूहि पळून जायच्या विचारात आहे पण शेजारी तो चाकर उभा असल्यानें त्याचा नाईलाज झाला आहे. पाडू थरथर कापत त्या इमारतीत शिरतो माडीवरच्या दिवाणखान्यात लोडाशीं टेकून पाढऱ्या शुभ्र दाढीचे आणि रेशमी अगरखा घातलेले एक वृद्ध गृहस्थ बसले आहेत. ते मोठ्या ममतेनें पाडूला जवळ बसवतात. आजूबाजूला नाटकातला नटसच बसलेला आहे. त्या वृद्ध गृहस्थाच्या माडीवर बसलेली एक छोटी चिमुरडी पोरगी म्हणते—

" दादा, हाच तो ! "

त्याबरोबर पाडूची घाबरगुडी उडते. या पोरीने नक्कीच नाटकाच्या तबूत शिरताना आपल्याला पाहिलें आहे असें त्याला वाटतें. आणि तो तुटपुज्या भाषेंत आपल्या अपराधाचें समर्थन करूं लागतो. तें पाहून दादासाहेबाना मौज वाटते. ते हसून म्हणतात—

" आमची अमला आम्हाला सागत होती कीं तू नाटकातल भाषण मोठीं छान म्हणतोस म्हणे. एखादे भाषण तूं म्हणून दाखविलेस तर आमचें नाटक चोरून पाहिल्याबद्दल आम्ही काहीं तुला शिक्षा करणार नाही. नाहीतर बघ बुवा. आमच्या पाठीमागें एक मोठी विहीर आहे. त्या विहींरींत तुला टाकून देऊ. "

छोटी अमला दादासाहेबाच्या माडीवरून उठते आणि पाडूच्या जवळ जाऊन बसते. आणि त्याला हातानें गदगदा हालवित म्हणते—" असं रे काय करतोस ! म्हण ना ? "

आणि मग लाजत लाजत पाडू ऐकलेलीं सभाषणे घडाघडा म्हणून दाखवू लागतो. दादासाहेब मान डोलावू लागतात. आणि आजुबाजूचीं माणसें विस्मयानें पाहूं लागतात. संभाषणे सपताच जमलेल्या माणसाकडून

२

पांडूवर शाबासकीचा वर्षाव होतो. आणि.. ..

पांडू मास्तर भानावर आले. जाईचें भाषण संपलें होते. तें भाषण ऐकण्यात बयो इतकी तल्लीन झाली होती कीं चुलीला लावलेली भाकर केव्हा जळून गेली, याचा तिलाहि पत्ता लागला नाही. आणि मग भानावर येऊन तिने मास्तराकडे पाहिलें, तेव्हा हातातला घास तसाच ठेवून ते कसल्यातरी विचारात मग्न झाले होते. ते पाहताच तिला भारी राग आला

" अहो, काय झोपबिप लागली कीं काय ? काय बाई तरी माणस असतात ! कस देवासारखं भाषण म्हणून दाखवल पोरीन ! अगदी भक्त प्रल्हाद आल्यासारखं वाटल मला. पण घरचीं माणस कौतुक करतील तर शपथ ! माणसात कौतुक उरलय् कुठं आता ? " अशा शब्दात ती तणतणूं लागली मास्तर भानावर येऊन हसले. पण त्याच्या हसण्यात खिन्नपणा होता

पोरीला जवळ घेऊन त्यानी तिचें कौतुक केलें आणि मग हातातला घास तसाच टाकून ते आचवण्यासाठी पानावरून उठले. आचवून पांडू मास्तर बाहेरच्या खोलींत आले तरी बयोच्या तोंडाची टकळी चाललीच होती पांडू मास्तराना काय होत होतें, हें तिला समजलें होतें की नाही कोण जाणे ? समजल्याचा आव आणून ती त्याच्यावर खरपूस तोंडसुख घेत होती पण ते तिला समजलें नव्हतें हेंच खरें ! कारण तिचा मास्तराच्या या अकारण उदासीन होण्याच्या लहरीशीं काहीं संबध नव्हता लग्न झाल्यापासून बयोनें मास्तराचा हा लहरीपणा पाहून ठेवला होता. खुषीत असले म्हणजे भडाभडा बडबड करणारे मास्तर कधीं कधीं अकारण कोमजल्यासारखे होत आणि एकदम चारचौघाच्या बैठकींतून उठून दूर निघून जात अशा वेळी त्याच्या तोंडाला जो टाळा लागे, तो ते पुन्हा माणसात येईपर्यंत लागलेला असे बयोला मास्तरांचा हा अव्यवहारी माणूसघाणेपणा मुळींच आवडत नसे. मास्तरानीं असे काही केले कीं तिचें मस्तक अगदीं भडकून जाई आणि संतापानें अद्वातद्वा बडबडत ती अगदीं थयथयाट करी. आताहि तसेंच झालें मास्तर बाहेरच्या खोलीत कपडे घालीत होते आणि बयो आत झाकपाक करीत तणतणत होती. तेवढ्यात मास्तर कुठें तरी बाहेर

जाण्याच्या तयारींत आहेत, याचा तिला सुगावा लागला. त्याबरोबर त्राटिकेच्या ठसक्यात ती बाहेर आली आणि खेंकसली—

" इतक्या रात्रीच थडींत कुठ निघालात बाहेर ? "

मास्तर खिन्नपणाने हसले आणि म्हणाले— " अग, कृष्णाबाईच्या उत्सवाला जायच नाहीं का मला ? मडळी वाट पहात असतील माझी ! "

" उत्सव गेला मसणात आणि मंडळी गेली चुलींत ! कुठले कोण लडदू येतात मेले आणि उत्सव करतात ! आणि तुमची आजारीपण काढावी लागतात मला ! "

" अग, अग उगीच लोकाना शिव्या का देतेस आत्ता जाऊन येतो बघ अवघे दहा मैल तर आहे ! " अस म्हणून पाडू मास्तरानीं डोक्याला टोपी घातली आणि बयोच्या उत्तराची वाट न पाहता, जाईचा पापा घेऊन ते बाहेर पडले रस्त्यावर येऊन आळी ओलाडेपर्यंत बयोचें तणतणणे त्याना ऐकू येत होतें. गावकुस ओलाडून पाऊलवाटेने ते तरातरा चालू लागलें. बयोच्या तणतणण्याचा विचार पूर्वींहि त्याच्या मनात कधी नव्हता त्यामुळें तो आता नाहीसा होण्याचा प्रश्नच नव्हता चद्रप्रकाशात पाऊलवाट तुडवताना ते स्वत:शीच हातवारे करून काहीं बेत योजत होते, त्या बेतावर काहीं स्वप्नें उभारीत होते आणि त्या धुदीत सपासपा रस्ता कापीत होते

आणि मग सुमारें दोन तासात ते कृष्णाबाईच्या घाटावर उत्सवाच्या जागी येऊन पोहोचले. घाटावर शेजारच्या शहरातून मागून आणलेल्या गॅसच्या बत्त्या थाटमाटात वाशाला टांगून झळकत होत्या. घाटाच्या विस्तीर्ण चबुतऱ्यावर बायकापोराची ठिचून रीघ लागली होती चबुतऱ्याकडे तोंड करून उभ्या असलेल्या एका देवळापुढील ओट्यावर उसनवारीच्या सामानावर रगभूमि उभारली होती या रंगभूमीचे रगपट थेट गाभाऱ्यात मारुतिरायाच्या पायथ्याशीं थाटलें होते. या ओट्यावर एक प्रशस्त विटलेला पडदा सैलपणें रुळत होता आणि या पडद्याच्या आत आणि बाहेर बरीच आगतुक माणसें अकारण गर्दी करून तिष्ठत होती रगपटात पोरासोराची पळापळ चाललेली होती. तेवढ्यात बातमी आली की पाडू मास्तर आले. त्याबरोबर रगपटातील या पोरासोराच्या आणि कार्यकर्त्यांच्याहि मुद्रा प्रसन्न झाल्या.

बाहेर चबुतऱ्यावर प्रेक्षकात ही बातमी पसरायला वेळ लागला नाहीं. उठून उभ्या राहणाऱ्या आणि मध्ये मध्यें पळापळ करणाऱ्या पोराना दटावणाऱ्या बाया, आणि या बायाना हाशहुश् करून गप्प करणारे पुरुष आपसात म्हणू लागले कीं ' पाडू मास्तर आले, आता नाटकाला सुरवात लवकरच होईल. ' लवकरच म्हणजे तरी देखील अजून तासाची बेगमी होती. कारण अजून सगळीं पात्रें रंगायचीं होतीं. तथापि पाडू मास्तराच्या नाटकासाठीं तास दोन तास खोळंबत तिष्ठत बसणे, काहीं विशेष आहे असे त्याना वाटत नव्हतें. त्यातून पाडू मास्तरानीं लहान मुलाचे हें नाटक बसविलें होतें. कृष्णाबाईच्या उत्सवात पहिल्यानेंच होणारा हा एक अभूतपूर्व प्रयोग होता. त्यामुळें गावकरी मंडळी सारी झाडून घाटावर उपस्थित झाली होती. पडद्याला रीळाची पुली बाधून पाडू मास्तर वाशावरून कसे बसे खालीं उतरले. हे काम करण्यासाठीं दुसरे अनेक जवान रंगपटात तयार होऊन उभे होते. पण रंगपटातील कोठल्याहि कामाला पाडू मास्तराच्या खेरीज कोणीहि हात लावलेला त्याना खपत नसे पाडू मास्तर मग रंगपटात आले, आणि सतरंजीवर बस्तान माडून पोराना रंगवू लागले. रगवता रगवता मास्तर मध्येंच पोराना म्हणाले—

" झकास झाल पाहिजे बर कारे पोरानों नाटक ! कुणी चुकला बिकला तर याद राखा. माझ्याशी गाठ आहे. आता शहरच्या गावीं नाट्यमहोत्सव व्हायचा आहे ......"

" पण मास्तर, आपल ' बालध्रुव ' नाटक पुन्हा एकदां लावायला सागा ना त्या उत्सवात. "—एक पोरगा म्हणाला.

" अरे तूं कशाला सागायला पाहिजे ते मला ! तुम्ही आपल कामाकडे बघा. सगळ्या गोष्टी वळणावळणान करून दाखविणार आहे मी, आणि बरं का हो ! ते आपले, हे, कुठ आहेत ? "

त्याबरोबर पडद्याशीं गप्पा छाटीत उभे असलेले उत्सवाचे चार दोन कार्यकर्ते रंगपटात आले मग मास्तर ' त्या ह्याना ' रावसाहेब स्वागताध्यक्ष झाल्याची बातमी ऐकवू लागले. मास्तरानी आपल्या कल्पनेनें महोत्सवाचा एक कच्चा आराखडा तयार करूनहि त्याना ऐकवला. महोत्सवाच्या अध्यक्षा-

पासून चिटणीसापर्यंतच्या नेमणूकाहि त्यानीं करून टाकल्या, आणि येणाऱ्या उत्पन्नातून एक नाट्यगृह उभारण्याचा सकल्पहि त्यानीं त्या ठिकाणीं सोडला. फक्त हे सर्व ठरविणारीं आणि घडविणारीं माणसें निराळी होती. पण नाटकाच्या बाबतींत मास्तराना आपपर भाव माहित नव्हता. क्रिकेटचे षोकीन कुठल्याहि दूरच्या दोन देशात झालेल्या सामान्याविषयीं त्वेषाने बोलताना अकारण हमरीतुमरीवर येतात त्याना जसे हे सामने जिव्हाळ्याचे जवळचे, अगदीं आपल्या आळींतले वाटतात, तसें मास्तराचें नाटकाच्या बाबतींत होतें कुठल्याहि शहरीं लागलेल्या नाटकाच्या जाहिराती देखील त्याना पाठ असत मास्तर, म्हणजे नाट्यव्यवसायावरील बहुजनसमाजात घरोघरीं प्रचार करणारें एक चालतेंबोलतें वर्तमानपत्र होते

मग काहीं वेळानें ‘ बालध्रुव ’ नाटक सुरू झालें नाटक अपेक्षेबाहेर रगत गेलें. प्रत्यक्ष पाडू मास्तराना या नाटकाचा आस्वाद घेता आला नाही. कारण रगपटात त्याची धावपळ चालली होती पण त्याची त्याना विशेष मातब्बरी नव्हती नाटकासाठीं अशी धावपळ झाली म्हणजेच त्याना बरें वाटत असे. तसेच लोकानीं झालेल्या नाटकाची स्तुति करावी असें त्यांना मनापासून वाटत होते नाटक सपले तेव्हा जवळ जवळ पहाट झाली होती. लोक घरोघर गेले, ते झालेल्या प्रयोगाची तोंड फाटेपर्यंत स्तुति करीतच ! ध्रुवाचे मुख्य काम लोकाना बरें वाटलें, तरी पाडू मास्तराचें मात्र त्यामुळे समाधान झालें नाहीं नाट्यमहोत्सवात या नाटकाचा जर प्रयोग झाला तर ध्रवाचें काम जाईला द्यावें, असा निर्णय मास्तरानीं मनाशीं केला

जमलेल्या माणसाची पागापाग झाल्यावर पांडू मास्तर घरीं जाण्याची तयारी करू लागले. तेवढ्यात उत्सवाचे प्रमुख कार्यकर्ते घ.ईघाईनें रगपटात आले आणि मास्तराना म्हणाले—

“ हे पहा मास्तर, तुम्हांला आता काहीं काम नसेलच. आता इथंच झोपा इथ सामान बरच पडलयू सभाळायला कुणी माणस ‘नाहींत आपल्यापाशीं आम्ही आता ‘ त्या इकडे ’ जाऊन येतों. झोपूं बिपू नका बर का. सकाळी त्या गुरव मास्तराच्या घरीं चहापाणी करून मगच जा ”

" अहो पण मला शाळा आहे सकाळीं आठ वाजता. " पाडू मास्तर अजिजीनें म्हणाले.

" हें आता येतोंच आम्ही. " असें म्हणून मास्तराच्या उत्तराची वाट न पाहता ते कार्यकर्ते पसार झाले.

मग मास्तर रिकाम्या रगभूमीवर येरझारा घालीत, बाजूला पडलेला नाटकमडळी काढण्याचा विचार पुन्हा मनातल्या मनात गोंजारू लागले. मग विचार करता करता मास्तराचे सारें शरीर आणि मन देखील थकून गेलें. सहज विश्राति घेण्यासाठीं मास्तर एका विंगपाशीं घोंगडीवर जरा पाय पसरून लवडले आणि त्याना केव्हा झोप लागली, तें त्याचें त्यानाहि समजलें नाहीं

सकाळ झाली. उन्हें वर आलीं. तरी मास्तर झोपलेलेच होते. देवळाचा पुजारी नदींतून स्नान करून पुजेसाठीं देवळात आला. तेव्हा त्यानीं मास्तराना झोपलेलें पाहिलें आणि त्याना हालवून जागें केलें मास्तर डोळे चोळत चोळत उठून बसले. क्षणभर त्याना कशाचाच उमज पडेना आणि एकाएकीं सारें त्याच्या लक्षात आलें ढोपरभर वर आलेलीं उन्हे त्यानीं न्याहाळलीं आणि त्याची भयानें गाळण उडाली. आज शाळेत डिपोटी येणार होते. येणार होते कसले, एव्हाना आलेहि असतील ! आणि मास्तराना अजून दहा मैल काटायचे होते मास्तर भीतीनें थरथर कापू लागले. गडबडीनें त्यानीं कशीबशी कोट टोपी चढाविली आणि रस्त्यानें ते धावत सुटले. .

●●●

## २

पाडू मास्तर जड पावलानी आणि थप्पड मारलेल्या मनानें शाळेच्या आवारातून बाहेर पडून घराकडे निघाले जे होऊ नये तें झालें जें घडूं नये म्हणून जिवाचे रान करून ते पळत सुटले होते तें घडलें इतकेंच नव्हे तर चागलें साक्षेपाने घडलें अशा वेळीं घाबरगुडी उडालेल्या माणसाची क्रूरपणें पारध करण्यात काळाला मौज वाटत असावी. मास्तराचें पळणे, त्याची उडालेली तारंबळ आणि पळता पळता त्याच्या तोंडाला आलेला फेस पाहून काळाला जर माणसाचे हृदय असतें, तर त्यानें आपली चाल निश्चितपणें मद केली असती निदानपक्षीं मारेंच काही असें विपरीत घडू दिलें नसते कधीं नव्हे ते दिपोटीसाहेब ठरल्याप्रमाणें, न चुकता, त्याच दिवशी शाळेंत आले रावसाहेबाच्यासारखे सूर्यवशी गृहस्थ लवकर उठून भल्या सकाळीं शाळेंत येऊन दाखल झाले होते अशा वेळीं पाडू मास्तराची निदान क्षणभर तरी त्याना विस्मृति व्हावी ? पण रावसाहेबानीं शाळेंत पाऊल टाकले तेंच मुळीं पाडू मास्तराची शोधाशोध करीत. आणि मग पाडू मास्तराच्या अनुपस्थितीमुळे शाळेंमध्ये गडबड उडून राहिली पाडू मास्तर धावपळ करीत शाळेत पोहोचले, त्यावेळीं वातावरण चागलेच तापलेल्या तव्यासारखें गरमागरम झालें होतें. रावसाहेबाच्या पासून हेडमास्तराच्या-

पर्यंत साऱ्यानीं त्याना त्यावर खरपूसपणें भाजून घेतले. आणि मग नोकरीवरून तात्पुरतें बडतर्फ झालेले पाडू मास्तर, जड पावलाने आणि थप्पड मारलेल्या मनानें शाळेच्या बाहेर पडले रस्त्यातून घरी जाताना पाडू मास्तर नेहमींप्रमाणें अनेक चेहऱ्याना अडखळले पण रोजच्या प्रमाणें ते कुणाशींहि उत्साहभरानें गप्पा मारण्यास थांबले नाहींत. त्याच्या मुद्रेवर चोरटेपणा आणि शरमिंदेपणा उमटला होता. गावचीं कांहीं माणसें रात्रीं कृष्णाबाईच्या उत्सवाच्या नाटकाला आलीं होतीं, तीं आता डोळे चोळत चोळत घराबाहेर पडताना मास्तराना दिसत होतीं त्यापैकीं बऱ्याच जणानीं मास्तराना रस्त्यात हटकले आणि नाटकाची तोंड फाटेपर्यंत स्तुति केली पण त्यामुळेहि मास्तराची कळी उमलली नाहीं अपराध केलेल्या मुलाप्रमाणें चोर पावलानें ते घरात आले आणि कोट टोपी काढून बाहेरच्या बस्करावर त्यांनीं बैठक मारली. शेजारींच एक जुने वर्तमानपत्र पडले होते बहुधा वाणसामानातून ते आलें असावें मास्तरानीं ते उचललें, आणि कडू मनाने वाचण्याचा आव आणण्यास त्यानीं सुरुवात केली त्याचें लक्ष सारें आतल्या बाजूला होतें आत बयो कुणाशीं तरी खुषींत येऊन बोलत होती तो दुसरा आवाज पाडू मास्तरानीं कान टवकारून ऐकला, आणि आपल्या बायकोचे मामा घरी आले असल्याचें त्यानी ओळखलें मामासाहेब म्हणजे एक बडे प्रकरण होतें. सपत्तीनें किंवा अधिकाराने नव्हे बोलण्याचालण्यानेच ! मामासाहेबाना कधीं हळू बोलणें माहीतच नव्हतें. दवडी पिटल्यासारखें ते कानगोष्टी करीत त्याना बोलायला विषय असा लागतच नसे. फक्त कुठल्याहि विषयांत उपदेश करणें त्याना आवडत असे. थोडक्यात चुकले, नाहींतर मामासाहेब एखाद्या प्रांतात नामदार मत्री म्हणून वा एखाद्या मठात बोवा म्हणूनच जन्माला यायचे ! विधाता कांहीं वेळा मोठ्या मजेदार चुका करतो त्या अशा ! अधिकार, योग्यता किंवा पात्रापात्रता याची कधी मामासाहेबांना विशेष फिकीर वाटत नसे. साऱ्या जगाला उपदेश करण्यासाठीं आपला जन्मच आहे असे त्याना वाटत असे. पण हे उपदेशामृत सरळ पाटबधाऱ्यातून कांहीं बाहेर पडत नसे. मामाच्या मुखाला काटेरी चक्रें जोडलीं असावीत कारण त्याचें कुठलेंहि वाक्य इरसाल हासडलेल्या शिवी-

खेरीज सुरू होत नसे अशा वेळीं सभ्यतेचे सकेत जरा त्यानीं सैल करून घेतले होते. पण मामाचें उपदेशाचें बोलणें हरदासाच्या अंगरख्यासारखें भोंगळ आणि पोकळ असे पण मामा पक्के वस्ताद होते. ते अघळपघळ बोलत असताना समोरच्या माणसाचे लक्ष आपल्याकडे आहे किंवा नाहीं यावर त्याची काकदृष्टि असे मामा मूळचे कुणाचे तरी उपाध्याय पण काटकसरीच्या ससाराने आणि आपल्या अघळपघळ स्वभावाने, मामानीं आपल्या हयातींत बरीच माया जमविली होती कुठल्याशा गावीं मामाची बरीचशी शेती होती अलिकडे काहीं वर्षे शेतीभाती सभाळूनच ते उपाध्यायाचा व्यवसाय करीत आणि तोहि धर्मकारणाच्या निमित्ताने लोकाना बराचसा उपदेश करता येतो यासाठींच.

आताहि मामासाहेब बयोला पैशाच्या देण्याघेण्यावरून असेच काहींसें ऐकवत होते. ते सागत होते, की जग लुच्च्या लोकानीं भरलेले आहे अशा जगात सरळ, साध्या धोपटमार्गी लोकाचा निभाव लागणें कठीण आहे. पैसा ही चीज किती दुर्मिळ आहे, तें त्यानीं सविस्तर वर्णन करून सागितले. त्यातला शब्द न् शब्द पाडू मास्तराना बाहेर ऐकू येत होता. आजच हें पैसापुराण मामासाहेबानीं का चालवावे, याचा पाडू मास्तराना बोध होईना. पण मामासाहेबाना कोणत्या विषयावर बोलण्याची बदी होती ? कदाचित् ते देशाच्या आर्थिक स्थितीबद्दलहि बोलत असण्याचा सभव होता. पाडू मास्तराना चिंता पडली ती वेगळ्याच गोष्टीची. त्याच्या बडतर्फीची बातमी गावात वणव्यासारखी पसरत होती. मामासाहेब विडीकाडीच्या निमित्ताने एकदा गावातून चक्कर मारून आले म्हणजे त्याच्या कानापर्यंत ती पोहचल्याशिवाय काहीं राहिली नसती आणि मग मात्र पाडू मास्तराचा निभाव लागणें कठीण होतें मास्तर याच मरणाला भीत होते. एकवेळ बायकोचे निर्भत्सनेचें बोलणे पुरवले पण मामासाहेबांचे मास्तराना उद्देशून केलेलें, पण सबध आळीला ऐकू जाईल असें झालेल, सार्वजनिक व्याख्यान नको, असे त्याना झालें होतें छडी मारण्यासाठीं अगावर धावून आलेल्या पतोजीला पाहून एखाद्या अपराधी पोराचा थरकाप व्हावा, तशी मास्तराची अवस्था झाली इतक्यात कसल्याशा निमित्तानें बयो बाहेर आली आणि

मास्तराना बस्करावर बसलेले पाहताच ती विस्मयचकित होऊन उद्गारली—

" अग बाई, तुम्ही केव्हा आलात ? "

तेवढ्यात पाठोपाठ मामासाहेबहि आले.

" कोण ? पाडोबा ! बर झाल तुम्ही भेटलात तुम्हाला मला काहीं सांगायचें आहे. म्हणजे त्याचे असे आहे " असें म्हणत मामासाहेब बयोकडे वळून म्हणतात—" बायडे अशी बघत काय उभी राहिलीस जावईबापूच्या हातात दोन पेढे आणून ठेव आधी. "

बयो चटकन् घरात गेली आणि तिनें आतून दोन पेढे आणून मास्तराच्या समोर ठेवले. मास्तराना वाटलें कीं मामा मुद्दामच आपली मस्करी करीत आहेत पण तेवढ्यात मामा म्हणाले—

" आता इकडे तिकडे बघूं नका. मटकावून टाका पेढे इतके दिवस श्रम केले त्याचं फळ मिळाल "

" पण मामा, एरवीं कधी मीं शाळेच्या कामात अगचुकारपणा केला नव्हता... "

" अहो पाडोबा, ते का तुम्ही आम्हाला सांगायला हव ! पण शाळेंतल काम वेगळ आणि हें कोर्टांतल काम वेगळं "

" कोर्टाच ? म्हणजे रावसाहेबानीं फिर्याद बिर्याद गुदरली कीं काय माझ्यावर ? "

" रावसाहेबाचा काय संबध ? कसली फिर्याद ? काय भानगड आहे ही ? "

" मग तुम्ही कसल्या कोर्टाबद्दल बोलत होता ? "

मग पाडू मास्तराना मामासाहेबाकडून कळले कीं भाऊबंदकीमुळें वाध्यात पडलेल्या जमीनीचा कज्जा मास्तराच्या बाजूने झाला होता या जमीनीपायीं मामानी ऊर फाटे तोपर्यंत कष्ट घेतले होते. पाडू मास्तराच्या लग्नाच्या वेळीं मामा मध्यस्थ होते. त्याच वेळीं मास्तराची काही थोडीशी जमीन त्याच्या भाऊबदानी जवळ जवळ गिळकृत केल्याचें, त्याच्या लक्षात आलें होते. स्वतः मास्तर ही जमीन मिळविण्यासाठीं फारसे उत्सुक नव्हते. पण मामासाहेबानीं त्याना स्वस्थ बसू दिले नाहीं. मास्तराच्याकडून मामानीं मुखत्यार पत्र घेतलें आणि त्यानीं कोर्टाचे उबरठे झिजवायला आरभ केला.

आज दहा वर्षे मामा खालच्या आणि वरच्या कोर्टात हा दिवाणी दावा मोठ्या हिरीरीनें लढवीत होते. कोर्ट दरबारचीं कामें म्हटलीं म्हणजे मामाना मनापासून आनद ! एरवीं मामा गादीवर प्रशस्त लोळत पडले असले, तर पानाला चुना लावायला काहीं उठून बसायचे नाहींत पण कोर्टाचें काम म्हटलें कीं भर दुपारच्या रणरणाऱ्या उन्हात आपल्या शेतवाडीपासून तालुक्याच्या गावापर्यंत तंगडतोड करायला ते मागे पुढें पाहत नसत. ही कोर्टातलीं कामें त्याचीं स्वत.चीं असत असेहि नव्हे. कोणाहि शेजाऱ्यापाजाऱ्याचे कोर्टाशीं निगडीत असलेले कज्जे निघाले कीं मामाचे पाऊल त्यात पुढें असे. पाडू मास्तराच्या जमिनीच्या बाबतींत मामानीं जी एवढी यातायात केली, त्याचें कारण मास्तराच्या आपुलकीपेक्षाहि कोर्ट दरबारची आवड हे प्रमुख कारण होतें. मास्तराच्या भाऊबंदानीं गिळलेली ही जमीन मामानीं त्याच्या घशातून ओढून काढली, इतकेंच नव्हे तर गेल्या आठ पधरा दिवसात ही जमीन विकून टाकण्यासाठीं त्यानीं बऱ्याच गिऱ्हाईकाच्या घरीं खेटे घातले होते. अखेर एका गिऱ्हाईकाशीं किफाईतशीर सौदा करून खरेदीखत झाल्यावर पैसे वसूल करून, मामा झालेल्या कामाचा हिशोब देण्यासाठी मास्तराच्या घरीं उपस्थित झाले होते. कोर्टाच्या कामाची इत्थभूत माहिती मामानी आजपर्यंत कैक वेळा सुनावली होती पण आज ही आता शेवटची वेळ म्हणून मामानीं आरभापासून त्याना जेवढे जेवढे म्हणून माहीत होते आणि आठवत होतें तेवढे मास्तराना सुनवून घेतले असे करण्यात सुमारें अर्धा तास गेला एखाद्या युक्तिबाज लघुकथा लेखकाच्या चतुर निवेदनाप्रमाणें आपल्या हकीगतीची अखेर त्यानी गुलदस्तात ठेविली होती. तिच्याबद्दल मास्तराची उत्सुकता वाढविण्यासाठीं ते पराकाष्ठा करीत होते पण मास्तर खिडकींतून दूर शून्यात पाहत निर्बुद्ध वाचकाप्रमाणे मख्ख चेहरा करून जे बसले होते, ते शेवटपर्यंत तसेच होते त्याच्या समोरचे पेढे बोलण्याच्या भरात आवेशपूर्ण रीतीनें मामानीच मटकावून टाकले होते बिचाऱ्या बयोनें पुन्हा एकदा आत जाऊन पेढे आणून मास्तराच्या समोर—पण मामाच्या पासून किंचित् दूर ठेवले आपली सारी हकीगत सपवून मामा मास्तराना म्हणाले—

" तेव्हा पाडोबा, सागायची गोष्ट अशी कीं जेव्हा इतक्या हजार भानगडी आणि लटपटी केल्या तेव्हा दोन हजार रुपये घेऊन आज मी तुझ्या घरी आलों आहे. पैसे तुझ्या बायकोच्या ताब्यात मोजून दिलेले आहेत. हो ! आपल्याला कुणाच्या तनखडीचा लोभ नाही. लोभ ठेवायचा कशाला ? देवानं आपल्याला काय कमी केलय् .. ? " आणि मग मामा स्वतःच्या जमीन जुमल्याची हकीगत सागू लागले पाडू मास्तर दोन हजाराचे आपण धनी झालो आहोंत ही वार्ता ऐकताच खाडकन् भानावर आले आणि विस्मयानें ते बयोकडे पाहूं लागले त्याना ती बातमी आरभीं खरी वाटेना. मामाचें चऱ्हाट चालले असतानाच बयोला त्यानीं तीन तीन वेळा विचारून खात्री करून घेतली. आणि मग मास्तर भाबावले, गडबडले आणि गोंधळले दोन हजार म्हणजे जणू कुबेराची दौलत आपल्या हातीं आल्यासारखें त्याना वाटलें. मामाच्या बोलण्यावरून त्याचें लक्ष उडालें आणि ते स्वतःच्याच मनात कल्पनाचीं कबुतरे उडवूं लागले आपल्या स्वतःच्या जमीन जुमल्याची हकीगत सपवून मामा म्हणाले— " तेव्हा पाडोबा सागायच तात्पर्य अस कीं तुम्ही ही नोकरी द्या सोडून ! अहो या मास्तरकींत काय मिळायच आहे माणसाला ? महिन्याचा पगार चिमटींत तरी मावतो का ? आमचं म्हणण अस आहे की तुम्ही आता इथ झक्कपैकी पिठाची गिरणी काढावी आणि चोख धदा करावा. पाच वर्षांत या गावात एक चाळ द्याल उठवून ! आहात कुठ ? ..."

मास्तराच्या मनात फार मोठी खळबळ माजली होती. त्याचा अस्वस्थपणा त्याच्या मुद्रेवर ओसडून राहिला होता मामाना वाटले नोकरी सोडावी लागेल म्हणून मास्तर अनमान करीत आहेत मग मामा थोडेसे रागावले आणि म्हणू लागले—

" या मास्तराचें आणि कारकुनाचें असेंच व्हायचें ! हिंमतीवर धदा करून धनदौलत उभारावी हें त्याना कधी रुचणार नाहीं महिन्याच्या पहिल्या तारखेस टुकूटुकू करीत तुटपुजा पगार मोजून घ्यायला याचा पाय पुढें. जन्मभर खर्डेघाशी करीत आणि बडबड करीत ही माणसें अशीच कुजायचीं..."

पण इतक्यात जाई शाळेतून घरीं परत आली आणि मामाच्या माडीवर बसून पेढे खाता खाता आपल्या बाबाच्या बद्दल लोक काय काय बोलत आहेत ते तिने मामाना सांगितलें. मास्तराना नोकरीवरून तात्पुरते बडतर्फ करण्यात आले आहे हें कळताच मामानी पाण्याचा तांब्या पुढे ओढला दोन फुलपात्रे भरून ते गटागटा पाणी प्याले आणि मग खाकरत पुन्हा म्हणाले—

" तरी पाडोबा तुम्हाला आम्ही पहिल्यापासून सांगत होतों, कीं नोकरी करताना असं वागून चालायचं नाहीं. नोकरी म्हणजे अशी करावी महाराज—आम्ही त्या सरदार थोराताच्या घरीं उपाध्यायाचं काम करीत होतों..." आणि मग मामानी त्यावेळच्या बऱ्याचशा गोष्टी मास्तराना पुन्हा एकदा ऐकवल्या. तेवढ्यात बयो तिथें आली. तिलाहि ती वार्ता समजली आणि मग वळीवाची सर यावी तशी मास्तराना कडाकडा बोलून ती चालती झाली. मामाना वाईट वाटलें तें इतकेंच कीं सरदार थोराताच्या घरच्या आठवणी सांगताना आपलें विषयाचें सूत्र तुटलें. मग गंभीर मुद्रेनें खाली मान घालून बसलेल्या मास्तराना उद्देशून मामा म्हणाले—

" पाडोबा, तुमचं बाकी सगळं ठीक आहे. पण एवढा नाटकाचा नाद सोडा. हा नाद माणसाला जडला कीं त्याच्या घरादाराचें खोबरें व्हायला वेळ लागत नाहीं. म्हणजे त्याचं असं आहे..."

पाडू मास्तर फाशीची शिक्षा झालेल्या गुन्हेगाराप्रमाणें करुण दृष्टीनें जमीन न्याहाळीत बसले होते.

● ● ●

# ३

पाडू मास्तराच्या घरी मामासाहेबाचा दोन दिवस मुक्काम होता. या वास्तव्यात त्यानीं पाडू मास्तराना कपडे कसे घालावे येथपासून तों झोपताना कोणत्या कुशीवर झोपावें येथपर्यंत प्रत्येक बाबतींत सविस्तर उपदेश केला. त्यानीं पाडू मास्तरानाच उपदेश केला असे नव्हे, तर पाडू मास्तराच्या शेजारीं पाजारीं राहणाऱ्या अनेक सद्गृहस्थाना हरएक बाबतीत सल्ला दिला. पाडू मास्तरानीं पिठाची गिरणी काढावी हे पालुपद, आपला मुक्काम हालवी तोंपर्यंत मामासाहेब उगाळीत राहिले बयोच्या मनात मास्तरानीं इतक्यात नोकरी सोडू नये, असें होते. मास्तराची बडतर्फी ही काहीं कायमची वज्रलेप झालेली घटना नव्हती. मास्तर असे कैक वेळा बडतर्फ झाले होते पण प्रत्येक वेळीं रावसाहेबाचे मास्तरानीं त्याच्या घरीं जाऊन पाय धरले, आणि त्याची दया भाकली म्हणजे रावसाहेब आपला निकाल फिरवीत असत या खेपलाहि मास्तरानीं तसेच करावें अशी बयोची इच्छा होती. दुसऱ्याचे पाय धरण्याची, माफी मागण्याची, आणि दया भाकण्याची मास्तराना इतकी सवय झाली होती कीं बयोने सुचविताच मास्तर रावसाहेबाच्याकडे जायला निघाले पण मामानींच त्याना अडवलें. माणसानें स्वाभिमान कसा ठेवावा, याबद्दल मास्तराना त्यानीं बरेचसें सुनावलें मास्तरानीं तें निमूटपणें

ऐकून घेतले. आणि आता हा स्वाभिमान परवडण्यासारखा होता. पिठाची गिरणी काढल्यापासून चार दोन वर्षांत मास्तर चाळ बाधून टाकणार होते नव्हे काय ?— असा बयो विचार करीत होती. म्हणून तिनेंहि मास्तराना दयायाचनेबद्दल फारसा आग्रह धरला नाही.

दोन दिवसानंतर मामा आपल्या गावी परत निघून गेले. ते नक्की केव्हा गेले हें मास्तराना समजलें नाहीं. कारण या दोन दिवसात मास्तर स्वतःच्याच तंद्रींत कुठें कुठें भटकत आणि कुणाकुणाशीं हवा तितका वेळ बोलत राहात होते. मामासाहेबाची गर्जना आणि त्याचें गल्लीच्या वळणावरूनहि ऐकू येणारें वक्तृत्व बराच काळ बद झालें, तेव्हा समस्त आळीकर बाधवानी ओळखलें, कीं मामासाहेबाचा मुक्काम हलला असला पाहिजे

पाडू मास्तर मनातून भारी कष्टी झाले होते. नोकरी गमावल्याचें त्याना दुःख झाले नाहीं परंतु लोकानीं दाखविलेल्या कोरड्या अनुकपेमुळें आणि सहानुभूतीमुळे ते दु.खी झाले रावसाहेबानीं त्याचा जो अपमान केला त्याबद्दल माणसाला शोभेल असा राग येण्याची प्रक्रिया त्याच्या मनात केव्हाच निवून थड झाली होती मास्तराना राग कसा तो येतच नसे, असें लोक म्हणत परतु मास्तराच्या बाबतीत तें केवळ त्याच्या सौजन्याचें प्रतीक नव्हतें लोकानी सदैव केलेल्या उपहासामुळे आणि लहानपणापासून जगणें सुसह्य व्हावे, यासाठी हरघडीला अनेकाचे पाय धरावे लागल्यामुळें मास्तराच्या मनातल्या रागाच्या सवेदना गारठून गेल्या होत्या त्याच्या अनुकपनीय जगण्यात अभिमान आणि राग या दोन्ही मानवी प्रवृत्ति भुईसपाट थोपटल्या गेल्या होत्या पण मास्तराना त्याचेहि विशेष दु ख नव्हतें. कारण अशा निर्जीवपणें लोकाच्या भूत दयेवर जगण्याची बाबत ही थोडीफार सवयीची गोष्ट आहे. सवयीनें माणसाला काय वाटेल ते करता येत सवयीने माणूस, माणसाच्या मुडके तोंडीवर, स्वत.च्या किंवा दुसऱ्याच्या शरीर-विक्रयावर, आणि रस्त्यावर पडलेल्या उष्ट्या खरकट्यावर उपजीविका करतोच कीं नाहीं ? तशापैकी काहीतरी जगणें मास्तर जगत होते आणि आता तर त्याना त्याचें काहीच वाटतच नव्हते. याचे कारण या जगण्याची त्याना चागली सवय झाली होती. एखाद्या कजाग आणि छळवादी

कुटुंबातील वर्षानुवर्षे पिचत जीवन कंठणाऱ्या सासुरवाशीणीसारखे किंवा एखाद्या संस्थानिकाच्या पदरीं त्याची खुषमस्करी करण्यात आपली सारी उमर घालविणाऱ्या एखाद्या विदूषकासारखे, मास्तर या जगात जगत होते.

मास्तराचें दुःख हें कोणाला समजण्यासारखें नव्हतें. तें कुठेतरी आत खोल खोल उमटलें होते. मुकामार बसलेल्या माणसाला आपल्या अंगावर वळ दाखविता येतात काय ? एखाद्या मडक्यातले पाणी थेंबाथेंबानें खालीं झिरपावे, तसे मास्तराच्या हृदयात हें दुःख झिरपत होतें त्यामुळें तें हृदय ओल आलेल्या जमीनीसारखें हळवें आणि दुखरें झाले होतें. गेले दोन दिवस मास्तर याच दुःखाच्या बेहोषींत कुठें कुठें भटकले होते आणि प्रत्येक वेळीं घरीं परततांना अनेकांच्या कुचेष्टेचे वार घेऊन अधिक व्यथित होऊन परत येत होते. गेल्या दोन तीन दिवसात रात्रीं अंथरुणावर पड-ल्यावर मास्तराना नीट शांत झोप देखील लागली नव्हती. मन भडकलें आणि हृदयाची कालवाकालव होऊं लागली म्हणजे मास्तर एकटेच रात्रींचे उठत. उशाशीं मेणबत्ती लावून ठेवीत आणि जीवापाड जपलेल्या आपल्या आवडत्या नाटकाच्या संग्रहातून एखादें नाटक काढून वाचूं लागत. नाटक वाचण्याला आरंभ करतां क्षणींच तिसरी घंटा होऊन पडदा वर गेल्याचा त्याना भास होई, आणि मग पुस्तकाच्या पानावर पडून राहिलेलीं पात्रे आणि झोपी गेलेले संवाद खडबडून जागे होऊन मास्तराचे मन व्यापून टाकीत असत. अशा वेळीं सदर नाटकातील कोणती भूमिका करणें आपल्याला आवडेल आणि शोभून दिसेल याचा ते निर्णय करून टाकीत असत. त्यांच्या मतानें सौभद्र, शारदा, कीचकवध, एकच प्याला, यासारख्या नाटकातील मह-त्वाच्या भूमिका त्यांच्या स्वतःशिवाय दुसऱ्या कोणालाहि करतां येणें फार कठीण होतें. या भूमिका करताना कोणती रंगभूषा करावी, अवघड प्रसंगीं अचूक भावा-विष्कार करण्यासाठीं कोणता अभिनय करावा, आवाजात चढेलपणा आणि मार्दव, आर्तता आणि कारुण्य, रोष आणि अनुराग, उपरोध आणि मिस्कीलपणा या छटा कशा कशा आणतां येतील, तें मास्तर स्वतःशीं हळू हळू पुटपुटून निश्चित करीत असत. आणि इतकें सगळें करतां करतां

मास्तराना केव्हातरी शातपणें झोप लागत असे. बयो मध्येंच जागी झाली म्हणजे मास्तराच्या छातीवर पुस्तक पडलें आहे, त्याच्या मुखावर प्रसन्न करुण स्मित विलसलें आहे, आणि त्याना शात झोप लागली आहे असें दृश्य तिला दिसें. आणि मग ती हलक्या हातानें पुस्तक उचलून ठेवी आणि मास्तराच्या अंगावर पाघरूण टाकी.

मामासाहेब ज्या दिवशीं आपल्या गावीं निघून गेले त्या दिवशीं मध्यरात्रीं मास्तर असेच व्यथितचित्त झाले होते. त्याच्या मनाची तगमग वाढली आणि त्याचा जीव गुदमरल्यासारखा आणि घाबरल्यासारखा झाला. मग ते उठले आणि त्यानी आपल्या उशाशीं मेणबत्ती लावून ठेवली. आणि आपल्या पेटींतून काहीं पुस्तकें चाळून 'झुंझारराव' नाटकाची जीर्ण प्रत त्यांनीं थरथरत्या हातानीं बाहेर काढली. हें नाटक मास्तराच्या फार आवडीचें होते. या नाटकात कधीं तरी झुंझाररावाची भूमिका करण्याचा बेत त्यानीं मनाशीं पुष्कळ दिवसापासून बाधून ठेवला होता. या नाटकातलें कुठलेंहि पान उघडलें कीं मास्तराच्या साऱ्या वृत्ति कशा बहरून येत मास्तरानीं पुस्तक उघडले, त्याबरोबर दुसऱ्या प्रवेशातील झुंझाररावाच्या भाषणाकडे त्याचें लक्ष गेलें. मनातल्या मनात वाचता वाचता मास्तर रगात आले, आणि अथरुणावर बसून मोठमोठ्यानें पुटपुटू लागले आवेशपूर्ण रीतीनें हात करून अंथरुणावर बसलेले झुंझारराव म्हणतात—

"शिवाय जतकुळीबद्दल म्हणाल तर, तुम्हाला म्हणून सागतो, मी जरी जातीचा कोळी, तरी काहीं हलका नाहीं—सरदारचा बचा आहे. पण आपलीच बढाई सागणे रास्त नव्हे, म्हणून ही गोष्ट मी छपवून ठेवली होती, समजलात? तसेंच, आज जो मी एवढ्या हुद्यावर चढलों आहे, तो तरी फक्त अंगच्या जोरावर चढलो, उच्च कुळातला म्हणून नाहीं. जाधवराव. कमळजा माझ्या मनात उतरली नसती,

"काय म्हणालात! कोण उतरली नसती?" मास्तराच्या बडबडीनें बयो जागी होऊन डोळे चोळत चोळत म्हणाली.

मास्तरांनी चटकन् पुस्तक मिटलें आणि दिवा मालवून ते अथरुणावर लवंडले. तरी अंधारातच बयो मास्तराच्या नाटकाच्या वेडाला बराच वेळ शिव्याशाप देत होती मास्तर मात्र झुंझाररावाचें काम करण्याची आपल्यावर पाळी आली तर दाढी मिशा कोणत्या. पद्धतीनें ठेवाव्यात याचा विचार करीत होते. आणि याच विचारात पुढें केव्हातरी त्याना झोप लागली.



# ४

पुढें दोन दिवस पिठाची गिरणी काढण्यासाठीं जागा घेण्यापासून तों यंत्रसामुग्री पैदा करण्यापर्यंत अनेक बाबतींत हालचाल करण्याची बयो मास्तराच्या मागे तगादा लावू लागली, आणि मास्तरहि एखाद्या आज्ञाधारक चाकराप्रमाणे अंग मोडून काम करू लागले. पण त्यात त्याचा जीव नव्हता. पिठाची गिरणी काढण्याची कल्पना मास्तरानी ओळखीच्या चारदोन लोकापाशीं काढताच त्यानी मास्तराना खुळ्यातच काढलें. मग मास्तर या बाबतींत कोणाशीं सल्ला मसलत करण्याच्या भरीला पडलेच नाहीत. त्याना या संबधात हवी असलेली माहिती एका माणसाकडून मिळण्यासारखी होती. तो म्हणजे नाक्यावरचा छोटू गिरणीवाला.

छोटूची नाक्यावर पिठाची गिरणी होती. ज्यावेळेला या गावात वीज नव्हती तेव्हाहि तेलावर चालणारी पिठाची गिरणी छोटूनें चालविली होती. वीज आल्यानतर एक दोन पिठाच्या गिरण्या गावात कोठेशा निघाल्या पण छोटूच्या गिरणीइतकी त्याची कधीच बरकत होऊ शकली नाहीं. त्याचें कारण छोटू आपल्या कामात फार वाकबगार, इमानदार होता अथवा त्याच्या गिरणींत बसवलेली यंत्रे फार कसोशीनें पीठ दळत होती असें नव्हे. छोटूची वाणी मिठ्ठास होती. स्वाभावानें तो अघळपघळ आणि बडबड्या होता. त्यामुळें गावामध्ये त्याची साऱ्याशी ओळख होती, गिरणींत येणाऱ्याशी आणि न येणाऱ्याशीं. छोटू म्हणजे गावातलें बातमीपत्रं होता.

गावात घडणाऱ्या साऱ्या खाजगी वा सार्वजनिक घडामोडी त्याच्या पिठागरात सायंकाळीं दाखल होत आणि मग त्यावर जमलेल्या मंडळींत खमगपणें चर्चा होई छोटूच्या गिरणीच्या परिसात यत्राशेजारीं चार दोन मोडक्या खुर्च्या टाकलेल्या असत गिरणी चालू असें तोपर्यंत त्या कधीहि रिकाम्या नसत. कोणीतरी चार दोन रिकामटेकडे टोळभैरव पानबिडीच्या निमित्तानें तेथें ठिय्या देऊन असत. कामाच्या वेळी पिठूळलेला कळकट पोषाख घालून, पिठाने सचैल स्नान घडल्यासारख्या अवतारात छोटू यत्राशीं आपले काम चोखपणें करीत, आलेल्या प्रत्येक माणसाशीं आवर्जून गप्पा मारीत असे.

छोटूकडून गिरणी चालविण्यासाठीं लागणाऱ्या यंत्रसामुग्रीची आणि इतर व्यवहाराची माहिती आपल्याला मिळूं शकेल या कल्पनेनें एक दिवस सध्याकाळीं पाडू मास्तर छोटूच्या गिरणींत आले छोटूने मास्तराना गिरणीच्या दाराशी पाहताच सुहास्य वदनाने ललकारी दिली. हातातले काम थाबवून मास्तराना तो किंचित् सामोरा गेला गडबडीने मास्तराच्या पुढें त्यातल्या त्यात धडधाकट खुर्ची करून त्याना तीवर छोटूनें अगत्यानें बसवले. मग शेजारच्या हॉटेलात बसल्या जागी ओरडून छोटूनें दोन सिंगल चहा सागितला मग उरलेल्या चार दोन गिऱ्हाईकाचें काम आटोपून छोटूने त्याना वाटेला लावलें. नंतर त्याने गिरणीच्या दाराशी माडलेल्या पायरीवजा दगडावर बसून पिठूळलेले अग धुतले आणि हे सारे करीत असताना तो मास्तराची मोठ्या मायेने विचारपूस करीत होता. त्याच्या वाणीत ही माया, ममता आलेल्या प्रत्येक माणसाच्या बाबतींत अशी दुथडी भरून वाहू लागे पण आज मास्तराच्या बाबतीत आलेला हा मायेचा पूर काहीं वेगळाच होता. मास्तराना देखील तो लक्षात आल्यावाचून राहिला नाही. मग केसातून फणी फिरवत, कुठल्यातरी लावणीची एक ओळ गुणगुणत छोटू मास्तराच्या समोर येऊन स्थानापन्न झाला. आणि हॉटेलमधल्या पोराने आणलेला चहाचा एक कप मास्तरांच्या हातीं देत आणि दुसरा स्वत.च्या हाती घेऊन तो त्याना म्हणाला—

“ पण काहीं म्हणा मास्तर, तुमची ही नोकरी जाणार हें मीं सहा

महिन्यापूर्वीच सांगितलं होतं 'त्या आपल्या ह्यांना.' ''

" खरं ! कशावरून वाटलं तुम्हाला असं ? "

" अहो, कशावरून काय विचारता मास्तर, तुमचे 'ष्टारच' शब्द मारून सांगत होते. "

आणि मग छोटूने मास्तराच्या मुखावर आपल्या भाषणाचा परिणाम अजमावला. सहा महिन्यापूर्वी हा अपूर्व शोध आपल्याला कसा लागला त्याची हकीगत त्यानें मोठ्या रसभरीतपणे सांगितली. छोटूला माणसाच्या कुंडल्या, हस्तरेषा आणि मुद्रापरीक्षा करण्याचा नाद आहे हे मास्तरांना यापूर्वी ऐकून माहित होतें. पण या शास्त्रांत तो इतका पारंगत असेल अशी त्यांची कल्पना नव्हती चारदोन ठोकळ गोष्टी एखाद्या ज्योतिष्यानें बिनचूक सांगितल्यावर ऐकणारा माणूस जसा बसल्या जागींच पाघळूं लागतो, तसे मास्तरहि पाघळू लागले त्यांनी आपला हात छोटूपुढे केला आणि मोठ्या अजीजीनें आपल्या भविष्यातल्या घटना उलगडून दाखविण्यासाठी ते त्याला विनंती करू लागले छोटूने आढेवेढे घेऊन सहजगत्या मास्तराचा हात आपल्या हातीं घेतल्यासारखे केलें. या हातावरून प्रथम ओझरती नजर टाकली आणि मग तो किंचित् चमकल्यासारखा झाला. खसदिशी हात जवळ ओढून डोळे फाडफाडून तो त्यात पाहू लागला. स्वतःशीच तो कांही पुटपुटला आणि मग खात्री झाल्याप्रमाणें मास्तराचा हात त्यानें दूर सारला आणि बाहेर जाऊन तोंडातले पान थुकून आला मग त्यानें खिशातली विडी काढली. आणि शांतपणें शिलगावली आणि असें करतांना प्रत्येक क्षणीं मास्तराची उत्सुकता त्याने शिगेला नेऊन पोंचविली. मास्तर पुनःपुन्हा त्याला ढोसून विचारू लागले मग छोटूनें विडीचा झुरका घेत घेत गंभीर मुद्रेने म्हटले—

" आज माझ्या विद्येचा कस लागायची वेळ आहे. खरं सांगा मास्तर, या दोन चार दिवसांत किंवा चार आठ दिवसांत तुम्हाला कांहीं तरी धनलाभ झाला असला पाहिजे. बोला, खरं आहे कीं नाही ? " आणि मग हा धनलाभ कसा झाला असेल याची अनेक चित्रें छोटूनें आपल्या मिठ्ठास वाणीनें रंगविलीं. त्याबरोबर मास्तर अगदी भाळून गेले. आणि

मंत्रानें भारलेल्या माणसासारखें त्यानीं सारे काहीं भडाभडा बोलून टाकलें. असें बोलताना छोटूनें हें अगाध ज्ञान कसे पैदा केले असावें याबद्दल त्याना चुकून देखील सशय आला नाही. कोणाबद्दलहि सशय घेणे हें मास्तराच्या स्वभावातच नव्हते मंडईतल्या भाजीवालीनें सागितलेले भाव, शाळेतल्या नाठाळ पोरानें दिलेल्या सबबी आणि हातउसने पैसे नेणाऱ्या शेजाऱ्याचे वायदे हे सारे त्याना नेहमींच खरें वाटत. त्याप्रमाणें छोटूचें बोलणेहि त्याना उत्स्फुर्त आणि प्रामाणिक वाटले. दोन दिवसापूर्वी आलेल्या मामासाहेबाचा गावभर फेरा झाला होता, छोटूच्या गिरणींत त्याची तासभर बैठक झाली होती; अशा बैठकींत आलेल्या इसमाकडून नवी नवी माहिती पैदा करण्यात छोटू तरबेज होता, या सगळ्या गोष्टी मास्तराच्या आठवणींतून झिरपून गेल्या. मग मास्तर पिठाची गिरणी काढण्याचा आपला बेत बोलून दाखवू लागले. तो बेत ऐकून छोटूनें वेडीवाकडी मुद्रा केली. आणि मास्तराना म्हटलें—

“ काय चेष्टा चालविली आहे काय, मास्तर ? पिठाची गिरणी काढायला तुम्ही काय आमच्यासारखे गावढळ आहात थोडेच ? असल्या धंद्यात पीठ चिवडताना कवडया रेवडया करून काय मिळणार आहे तुम्हाला ? या धद्यात आता उरलंच काय ? पोटाची खळगी भरायची म्हणून आम्हीं या धद्यात आहोत मास्तर, आणि तुम्हीं खूप गिरणी काढाल पिठाची ! अहो, पण तुमचे ‘ष्टार’ ? ते कोकलून दुसरच सागताहेत ना काहीं ! ”

त्याबरोबर मास्तर पुन्हा एकदा पाघळले आणि म्हणाले—

“ काय, काय म्हणताहेत बुवा आमचे ‘ष्टार’ ?

छोटूने मास्तराचा हात पुन्हा एकदा नीट निरखून पाहिल्यासारखे करीत काही रेषावर बोट ठेवीत आणि उचवटे दाबीत म्हटले—

“ मास्तर अगदी बालगंधर्वासारखा हात आहे तुमचा. कोणत्या तरी कलेत तुम्ही सम्राट होणार. हा शुक्राचा उंचवटा, ही गुरुच्या उचवट्यावर गेलेली आयुष्याची रेषा, आणि ही लाबसडक निमूळती बोटें—छे छे ! मास्तर, तुमच्यासारख्या कलावंतानें अगाला पीठ फासून आमच्यासारखे बैरागी व्हावे हें आम्हाला काहीं बरें वाटत नाहीं बुवा ! यापेक्षा तुम्ही दुसरा एखादा व्यवसाय...”

हें सारें बोलणें मास्तराच्या काळजाला हात घालीत होतें.

मास्तर हळूच छोटूला म्हणाले—" मनात पुष्कळ आहे, पण तें काहीं जमेलसें वाटत नाही. "

" तुमचं हें असलं बोलणं काही आम्हाला पसत नाहीं. आमच्यासारखे जीवाला जीव देणारे मित्र मग आहेत कशाला ? " छोटू सात्विक संतापानें म्हणाला—" तें काहीं नाही ! मास्तर, तुम्ही एखादे फक्कडसे नाटक-बिटक... "

" एक स्वतःची नाटक कंपनी काढावी अशी फार दिवसापासून इच्छा होती माझी—" मास्तर रात्रीचा प्रसंग आठवून धुद दृष्टीने कुठें तरी शून्यात पाहत म्हणाले.

" काय लाख बोललात ! तुमचे 'ष्टार' तरी दुसर काय सागताहेत ? मास्तर साहेब, झकास कल्पना आहे अगदी. भागीदार म्हणून तुम्ही आम्हाला घ्या तुमच्या कंपनीत. तुमचे पैसे, आमचे श्रम ! अगदी नंबरी काम करून टाकूं. अहो, बघता बघता पैशाच्या राशी ओतल्या जातील. आहात कुठ ? ... "

आणि मग छोटूनें नाटक कपनीच्या व्यवसायातून मोठमोठ्या नटाचा भाग्योदय कसा झाला याची रसभरीत वर्णनें केलीं. पण मास्तराचें तिकडे लक्षच नव्हतें. आपल्या कपनीतर्फे पहिले नाटक कोणतें बसवावें आणि आपण त्यांत कोणती भूमिका करावी या विचारात ते मश्गूल झाले होते. मग काहीं वेळानें मास्तर घरीं जाण्यासाठीं उठले. तेव्हा नाटक कपनी काढण्याचा आराखडा ठरविण्यासाठीं छोटूने मास्तराना पुन्हा गिरणीत येण्याचें आमत्रण दिलें. आणि मग मास्तर कसल्या तरी खुषींत, कसल्यातरीं धुंदींत, तरातरा घराची वाट चालू लागले.

मास्तराची पावलें कोपऱ्यावरून वळलीं असतील नसतील, तोंच गिरणीच्या बाहेर पानविडीचे दुकान थाटून बसलेला कोणी एक इसम गिरणींत आला, आणि विडी पीत आवराआवर करणाऱ्या छोटूला मिस्कीलपणें हसत म्हणाला—" काय छोटूमिया, नवीन कूळ घेरलेल दिसतय ? "

छोटू हसला आणि मोठ्याने गुणगुणला—" किस्मत हमारे साथ है, जलनेवाले जला करे. "

● ● ●

# ५

मास्तर घरी पोहोचले तेव्हा रात्र झाली होती. कसल्यातरी तद्रीत त्यांनीं घरात प्रवेश केला. कोट टोपी खुंटीला अडकवली आणि पेटीमधील नाटकाचीं पुस्तकें ते चाळूं लागले. त्याची चाहूल लागताच पदराला ओले हात पुसत बयो बाहेर आली, आणि मास्तराना पाहून म्हणाली—

" काय येणं कीं काय हें ? उशीर म्हणजे करायचा तरी किती ? पोरगी तुमची वाट पाहून पाहून निजली. घरीं बायकापोरं आहेत, आपल्याला उशीर झाला तर ती वाट बघतील, काळजी करतील, याची काही शुद्ध बुद्ध ?... " बयो असे पुष्कळसें तणतणून बोलत राहिली, पण मास्तरांचें तिकडें लक्ष नव्हतें. पेटींतलीं पुस्तकें चाळून, त्याचें काहीं शोधाशोध करण्याचें काम चालले होतें. मग बयो मृदु आवाजात म्हणाली—

" गेला होतात त्या कामाचं काय झालं ? "

तंद्रीतून भानावर येत मास्तर उत्तरले—

" ऊं ? अ !—कामाच होय ? ठीक, उत्तम झालयू कीं ! "

बयो आनदान म्हणाली—

" बरं झाल बाई, देव पावला ! सुटलात एकदाचे त्या मास्तरकीच्या जंजाळातून ! "

" नाहीं, तुला वाटतो तितका काहीं मला मास्तरकीचा जजाळ वाटत नव्हता. पण आता इकडे जास्त वाव मिळेल हें खरं ! "

" छोटूमिया काय म्हणाला ? "

" काय म्हणणार आहे ? त्यानंच तर सागितलं की माझे 'ष्टार' फार चागले आहेत म्हणून. महिन्याभरात देणार दणका उडवून. "

" अगबाई ! खरच ? जागा तरी कुठ घेतलींत ? "

" जागेची तशी काहीं जरूर नाही. छोटूमियाच्या हॉलमध्ये सध्या तालमीला आरभ करणार आहोंत आम्ही. "

त्याबरोबर बयोची आनंदी मुद्रा खार्कन् उतरली, आणि गोंधळून तिनें विचारलें—

" तालमी ? कसल्या तालमी ? "

मास्तर भानावर येत उत्तरले—"कसल्या म्हणजे ? नाटकाच्या." आणि मग त्याच्या सारे लक्षात येऊन मनःपूर्वक हसत ते म्हणाले—" अग हो. तुला सागायच विसरलोंच. नाटक-कपनी काढायची ठरविली आहे आम्हीं " असे म्हणत पाडू मास्तर बयोच्या मुद्रेवरील फेरफार कावऱ्याबावऱ्या मुद्रेनें न्याहाळूं लागले. बयोची मुद्रा रागाने रसरसू लागली आहे असे दिसू लागताच मास्तर घाईघाईनें उपरे हसून खुलासा करूं लागले—

" म्हणजे त्याचं असं आहे– पिठाच्या गिरणीच्या धद्याला आजकाल काहीं बरकत उरली नाहीं आणि अग हो, तुला सागायच राहिलच छोटू-मिया म्हणत होता की नाटकातच माझा भाग्योदय होणार आहे. अग, माझे ' ष्टारच ' सागताहेत तसें... "

" डोबल सागताहेत तुमचे ष्टार– " बयो कडाडली, " डोकबिकं फिरलय कीं काय ? की म्हातारपण यायच्या आधीच म्हातारचळ लागलाय ? पिठाची गिरणी काढण्यासाठीं म्हणून चौकशी करायला तुम्हाला धाडल आणि नाटक कंपनी काढण्याचं ठरवून तुम्ही परतलात काय म्हणाव तरी काय तुम्हाला...? " अशी बयो बरीच तणतणली.

मास्तर अशा वेळीं खरे म्हणजे शात राहत असत. बाहेरच्या खोलीत बस्करावर ठाण माडून आढ्याकडे पाहत मास्तर लवडत असत. किंवा

खालीं मान घालून आणि पाठीमागें हात घेऊन शतपावली करूं लागत. पण आज तसें झालें नाहीं. बयोच्या हातात पैसा होता. आणि तो मास्तराच्या हातीं पडल्याखेरीज मास्तरांचीं मनोराज्यें आकार धरूं शकणार नव्हतीं. म्हणून परोपरीनें मास्तर बयोला आपली योजना मवाळकीच्या स्वरात समजावून सागूं लागले. पण बयो मुळीं मास्तरांचें ऐकायलाच तयार नव्हती. चिडून संतापून ती अधिकाधिक थयथयाट करूं लागली.

आणि मग कधी नव्हे तो मास्तरानाहि राग आला. पण मास्तराचा राग असा सहजासहजी दिसत नसे. बयो रागावली म्हणजे तिच्या तोंडातून फटाके उडत असत. पण मास्तर रागावले म्हणजे एकदम ते गभीर असत. त्याचीं कानशिलें लालबुंद होत असत. आणि त्याच्या कपाळा-वरील दोन शिरा टरटरून ताठ होत असत. दिवसचे दिवस ते कुणाशीं बोलत नसत. त्याचा राग आतल्या आत पेटत जाई. दोन दोन तीन तीन दिवस ते अशा वेळी बोलणच नव्ह तर जेवणखाण देखील वर्ज्य करीत. त्याचो मुद्रा गंभीर आणि करारी दिसूं लागे. त्याच्या डोळ्यात अंगार उसळलेला बघणाऱ्याच्या प्रत्ययास येई पण मास्तराना हें असें रागावणें कधीं जमत नसे. मागें एकदा ते असेच बयोवर रागावले होते. बयोने चार वर्षाच्या चिमुरड्या जाईला कसल्याशा क्षुल्लक अपराधावरून खूप धोपटलें होतें. त्यावेळीं मास्तर असेच रागावले होते त्यावेळीं आठ दिवस त्यानीं बयोशीं बोलणे टाकलें होतें. लहान मुलाना मारलेले मास्तराना अगदीं खपत नसे.

पण त्यानंतर मास्तर पुन्हा आजपर्यंत असे कधी रागावले नव्हते. बयो मास्तराच्या नाटकाच्या वेडाबद्दल शिव्याशाप देऊ लागली की एरवी ते हंसण्यावारी नेत असत. पण मास्तराचे समजूतीचे सारे मार्ग संपल्यावर आज त्याची मुद्रा अशीच रागीट आणि करारी झाली ते किंचित् करड्या स्वरात म्हणाले—

" ठीक आहे. जशी तुझी मर्जी ! तुला काय करायच असेल ते करायला तू मोकळी आहेस. मी काहीं पिठाची गिरणी काढणार नाहीं. " असें म्हणून ते जोरजोरात शतपावली घालूं लागले. बयो मास्तराच्या उत्तरामुळें

जास्तच चिडली. आणि उसळून आणखी कांहीं वेडेवाकडें शब्द बोलू लागली, ती अशी बराच वेळ बोलत राहिली असती. पण जिन्यातून " पाडोबा ' म्हणून कुणीतरी हाक मारलेली तिच्या कानावर आली. आणि ' आहेत का पाडोबा घरात ? ' असें पुकारत अगात बाराबदी घातलेले आणि पचा नेसलेले वैद्यबुवा बाळूकाका काठी टेकत टेकत जिन्यातून वर येताना तिला दिसले. मग बयो धुसपुसत चुलीशी हुज्जत घालू लागली.

बाळूकाकाचें मास्तरानीं स्वागत केलें. आणि त्याना बसा म्हटलें. बाळूकाका म्हणतात—

" अरे, बसा म्हणायला काय आम्ही रिकामटेकडे लोक आहोंत ? अजून संध्या, धूपारती सार कांहीं यथासाग व्हावयाचें आहे. म्हणजे झाल काय, आपले ते ढवळीकर डॉक्टर आहेत ना, त्याच्याकडे कर्नाटकातले सुप्रसिद्ध वैद्य तम्मण्णाचार्य आले आहेत असें समजले. म्हणून त्याच्या भेटीस गेलों होतों मनुष्य मोठा उमदा आणि लाख मोलाचा आहे बर का ! तर सागायची गोष्ट काय—निसर्गोपचारामध्यें ह्या भागात तरी या माणसाचा हात कोणी धरू शकणार नाहीं. म्हटल तुझ्या प्रकृतीच्या बाबतींत बघूं स्वारी कांहीं किमया करते आहे कीं काय तें."

" तुम्हीं सागितलत त्याना माझ्या प्रकृतिविषयी ? " मास्तरांनीं उत्सुकतेनें विचारलें.

" सागितलं म्हणजे, त्याचसाठीं इतका वेळ बसलों होतो तिथ. आता मी तुला त्यांच्या हातीं सुपूर्द करणार, आणि मग मी घरीं चालता होणार."

" आताच जायचं का त्याच्याकडे ? "

" आताच म्हणजे ? जायलाच हवें मग इतकी धांवपळ करून मी आलो कशासाठीं ? तम्मण्णाचार्य उद्या पहाटे काशीला जायला निघणार आहेत मोठा नामाकित माणूस ! त्याच्या हातून तुला गुण यायचा असला तर सधि गमाविली असें होऊ नये."

" चला, जाऊ या आपण " असें म्हणत पाडू मास्तरानीं कोट-टोपी घातली. तेवढ्याच धुसपुसत बयो बाहेर येऊन म्हणाली—

" जेवायचीं पानं वाढलीं आहेत. "

मास्तर बयोकडे न पाहताच बाहेर पडले, आणि जिना उतरून बाळू-काकांच्या पाठोपाठ घराबाहेर पडले मग बयोनें आत जाऊन मास्तराच्यावर शिव्याशापाची लाखोली वाहिली. भाग्याची आदळआपट केली. आणि त्याचे पर्यवसान ती मुसमुसून रडण्यात झाले. मग थोड्या वेळाने ती उठली. तयार झालेल्या स्वयपाकाची तिनें घुश्यातच झाकपाक करून टाकली आणि रागारागाने जाईच्या अथरूणावर जाऊन डोक्यावर पाघरूण घेऊन ती उपाशीं लवडली.

बाळूकाका मास्तराना घेऊन ढवळीकर डॉक्टराच्या घरीं आले. वाटेंत बाळूकाका खूप काहीसें बडबडत होते आणि मास्तर मुकाट्यानें ऐकत होते. बाळूकाकानीं निसर्गोपचारावर एक लाबलचक व्याख्यान दिलें तम्मणा-चार्यांचा या क्षेत्रातला अधिकार त्यानीं वर्णन करून सागितला मग त्याच्या उपचारामुळें, डॉक्टरानी आशा सोडून दिलेले काही रोगी देखील कसे खडबडीत बरे झाले, याच्या हकिकती त्यानी रसभरीतपणें कथन केल्या. ढवळीकर डॉक्टर तम्मणाचार्यांना कसा मान देतात त्याचाहि त्यानीं उल्लेख केला. हें सारें मास्तर निमूटपणें एकून घेत आहेत हे पाहून बाळूकाका स्वतःवर खूष झाले. कारण बाळूकाकाच्या घरीदारी त्याचें बोलणे इतक्या आस्थेवाईकपणें कोणीच ऐकून घेत नव्हतें. म्हणून बाळूकाका मास्तराच्या प्रकृतीबद्दल त्याना चागला सल्ला देणार होते. पण तेवढ्यात त्याना खोकल्याची उबळ आली आणि ती ओसरत आहे तोच ते डॉक्टरसाहेबाच्या घरी येऊन पोहोंचले

डॉक्टरसाहेब आणि त्याचे पाहुणे तम्मणाचार्य ओसरीवर थाटलेल्या दवाखान्यात ऐसपैस गप्पागोष्टी करीत बसले होते मधून मधून एखादा दुसरा रोगी आल्यास डॉक्टरसाहेब त्याला औषध तयार करून देत आणि वाटेला लावत. पण त्यामुळें त्याच्या गप्पा मारण्यात मुळीच खड पडला नाहीं. पाडू मास्तराना घेऊन बाळूकाका आत आले आणि अदबीने किंचित् दूर एका बाकावर बसले. मग सधि साधून पाडू मास्तराची त्यानी तम्मणा-चार्यांना ओळख करून दिली. तमण्णाचार्यांनीं पाडू मास्तराना न्याहाळत तपकीरीची चिमूट नाकात कोंबली आणि मग मास्तराच्या प्रकृतीचा पूर्वेति-

हास ते बाळूकाकाना विचारूं लागले. बाळूकाका अघळपघळपणें म्हणाले—

" हा पाडू मास्तर म्हणजे आमच्या भद्रेश्वर हरदासाचा मुलगा. ह्याचा बाप मोठा नामांकित कीर्तनकार होता बरं ! ओहोहो ! काय त्याचीं तीं कीर्तनं ! रुक्मिणी स्वयंवराचं आख्यान लागलं म्हणजे..."

त्याबरोबर शीघ्र कोपी तम्मणाचार्य म्हणाले—

" तुम्हाला मी भद्रेश्वर हरदासाचं आख्यान लावायला सांगितलं नाहीं. याच्या प्रकृतीविषयीं विचारतो आहे मी ? "

तम्मणाचार्यांच्या गर्जनेबरोबर बाळूकाका खजील झाले आणि मास्तराच्या प्रकृतिविषयी चाचपडत ते त्याना कांहींसें सांगूं लागले त्याचे चाचपडणें पाहून ढवळीकर डॉक्टर हसू लागले. मग डॉक्टर स्वतःच म्हणाले—

" मी सांगतो काय झालं आहे तें. हा पाडू लहानपणी नाटक कंपनींत बालनट म्हणून काम करीत होता. कुठल्याशा एका नाटकात काम करीत असताना— "

" कुठल्याशा कशाला, त्या आपल्या --कोणत्या हो मास्तर ? " मध्येंच बाळूकाकानीं तोंड खुपसत म्हटलें.

" बालध्रुव नाटकात काम करीत होतों मी तेव्हा. " पाडू मास्तर उदास मुद्रेनें म्हणाले.

मग डॉक्टर म्हणाले—" आठ दहा वर्षांचा असेल त्यावेळीं हा. त्याच्या मेंदूला ताण पडला असावा. आणि त्यामुळेंच त्याला कोरिआचा ॲटॅक आला. त्यावेळी इथे डॉक्टरहि कुणी फारसे नव्हते. घरची गरीबी. त्यामुळें उपचार वेळेवर झाले नाहींत. आणि..."

" समजल, समजल. " तम्मणाचार्य सहानुभूतीच्या स्वरात म्हणाले— " आणि डॉक्टर असते तरी त्यांनी काय केलं असतं ? तुम्ही डॉक्टरांनीं माणसाना कसलीं कसलीं औषधं टोचावीत, शरीराची कापाकापी करावी, नाहीतर बाटल्या भरभरून औषध पाजीत सुटावें आहे काय तुमच्या शास्त्रात या पलीकडे दुसर ?

डॉक्टर त्यावर फक्त हसले. मग तम्मणाचार्य पाडू मास्तराची प्रकृति तपासू लागले प्रकृति तपासताना त्यांची आपल्या हातापायाच्या आणि

ओठाच्या हालचालीवर बारीक नजर असावी असें मास्तराच्या लक्षात आलें. त्यामुळें मास्तर अस्वस्थ झाले. या अस्वस्थतेमुळें त्याच्या शरीराच्या या अवयवाच्या अधिक वेड्यावाकड्या हालचाली होऊ लागल्या तम्मण्णाचार्यांनीं बहुधा हीं वस्तुस्थिति हेरली असावी. कारण ताबडतोब त्यानीं मास्तराकडे रोखून पाहणे सोडून दिलें. दुसराच काहीं एक विषय त्यानीं बोलण्यासाठीं काढला. विषयाच्या ओघात चार दोन मौजेच्या गोष्टी त्यानीं सागितल्या, आणि सर्वाना खदखदून हसविले. मग क्षणार्धात पाडू मास्तराना त्यानीं प्रसन्नचित्त केले. मग सहजगत्या बोलावें तसें तम्मणाचार्य म्हणाले—

" काहीं चिंता नाहीं मास्तर आता तुम्ही चागले खडखडीत बरे होणार आहात आपल्याला काहीं झाल आहे या कल्पनेनं कुढत बसायच तुम्ही पहिल्यादा सोडून द्या. आणि हे पहा, हया डॉक्टराच्या आणि वैद्याच्या नादीं लागूं नका. हे डॉक्टर बेटे तुम्हाला औषधं पाजतील नाहीतर सुया टोंचतील. आणि हे वैद्यराज कसल्या कसल्या मुळ्या उगाळून तुम्हाला मात्रा देतील नाहीतर काढे घशात ओततील. आपल्याला तसल काही एक करायची जरुरी नाहीं. तुम्हाला अगदीं आवडतील, रुचतील अशा गोष्टी करायला मी सागणार आहें. पण त्यात मात्र चुकायच नाहीं हो... "

तम्मण्णाचार्यांचें रोगनिदान बरोबर होते किंवा नाहीं कोण जाणे—पण त्याची बोलण्याची पद्धति मात्र विलक्षण मोहक होती. त्याचा प्रत्येक शब्द आईच्या हस्तस्पर्शाप्रमाणें पाडू मास्तराना गोंजारीत होता. त्यायोगें मास्तराना नवा हुरूप येत होता. मग तम्मणाचार्योनीं आपल्या उपचाराची सविस्तर रूपरेषा मास्तराना आणि बाळूकाकाना समजावून दिली. सूर्यस्नान, चद्रस्नान, तसेंच विविध प्रकारच्या रगीत बाटल्यातून प्यावयाचें पाणी, सकाळ सध्याकाळ गावाबाहेर सहल, शक्य तर मजूळ स्वरात म्हटलेलें गाणें ऐकणें, सूर्योदयानतर आणि सूर्यास्तापूर्वी भोजन, अशा कितीतरी गोष्टी तमण्णाचार्यांनीं हासत खेळत विवरण करून सागितल्या. त्या ऐकून मास्तराना बरीच मौज वाटली. आणि इतक्या साध्या उपचारानें आपला रोग बरा होऊ शकेल की काय याची शकाहि त्याच्या मनात डोकावून गेली. पण तमण्णाचार्य गंमतीने बोलत नव्हते. त्याच्या बोलण्यात सहजपणा असला

तरी जिव्हाळा आणि अधिकारवाणी होती. शिवाय डॉक्टराचे व वैद्याचे सारे उपचार जवळ जवळ थकलेले होते. पाडू मास्तराना बरें होण्याची जबरदस्त उत्सुकता लागली होती नव्हे काय ? ते या रोगातून मुक्त झाले असते तर—

अशी जर तरची भाषा मास्तरानी यापूर्वी अनेक वेळा केली होती आणि प्रत्येक वेळीं नवे नवे उपचार नव्या नव्या उमेदीनें त्यानीं केले होते तसेंच यावेळीं ते करून पाहणार होते. म्हणून बालकाच्या निरागसतेने तमण्णाचार्यांचें बोलणे ते ऐकू लागले.

सारे सपल्यावर पाडू मास्तर निरोप घेऊन जाण्यासाठीं उठले. ते दाराशीं जाऊन पोहोचले असतील नसतील तोंच तमण्णाचार्यांनीं त्याना पुन्हा हाक मारली आणि म्हटलें—

" हे पहा, आणखी दोन गोष्टी लक्षात ठेवावयाच्या पहिली गोष्ट अशी की, डोक नेहमी शात ठेवलं पाहिजे कुणावर रागवायच नाही, जीवाचा संताप करून घ्यायचा नाहीं, चिडायचं नाही, दुःख करून घ्यायचं नाही, अस केल तरच या उपचाराचा गुण येईल मन कशानेंहि अस्थवस्थ झाल म्हणजे, म्हणजे......अस पहा, तुम्हाला, कोणती व्यक्ति म्हणा—गोष्ट म्हणा—जीवापाड आवडते ? "

मास्तर स्वतःशीं शोध घेऊ लागले. त्याच्या ओठावर शब्द आले होते ' नाटकाशिवाय आणि माझ्या छोट्या जाई शिवाय मला दुसरें काय प्रिय असणार ? " पण ते काहींच बोलले नाहींत. नाटकाचा उल्लेख तम्मण्णाचार्यांना रुचेल किंवा नाहीं याची त्याना शंका आली. म्हणून ते गप्प बसले. तम्मण्णाचार्य म्हणाले—

" अमूकच एक असं मी सागत नाहीं पण अशा वेळीं आपल्या आवडीच्या व्यक्तीच किंवा गोष्टीचं स्मरण कराव आणि शंभर अक मनातल्या मनात मोजावे. ही झाली एक गोष्ट. आणि आता दुसरी गोष्ट. बाळूकाका, याबाबतींत तुम्हाला मास्तराच्यावर लक्ष ठेवायला हवं. कारण मी एकदा काशीला गेलो म्हणजे वर्षभर दक्षिणेंत परत येणार नाहीं. "

पाडू मास्तर जीवाचा कान करून ऐकू लागले. तम्मण्णाचार्य पुन्हा एकदा नाकात तपकीर ठासून म्हणाले--

" हा उपचार सुरूं केल्यापासून पंधरा दिवसात रोग किंचित् बळावल्याचं तुमच्या लक्षात येईल. पण तेवढ्यानं घाबरून जायच नाहीं. सुमारे महिना-भरानें हळूहळू उतार पडत रोगाची बाह्य चिन्हें नाहीशी झाल्यासारखीं वाटतील. पण याच काळात जपलं पाहिजे. कारण रोगाचीं बीजं समूळ नष्ट व्हायला कमीत कमी वर्ष तरी लागेल. तोपर्यंत डोक्याला त्रास होईल असं कुठलहि काम अंगावर घ्यायच नाहीं. नाहीतर झालेले सर्व उपचार काया जातील, आणि मग मात्र जगातला कोणताहि धन्वंतरी तुम्हाला बरं वरूं शकणार नाहीं. "

मास्तरानीं तम्मणाचार्यानीं दिलेल्या साऱ्या सूचना ततोतत पाळण्याचं त्याना वचन दिल. आणि एका नव्या उमेदीने ते बाहेर पडले.

मास्तर निघून जाताच डॉक्टर उद्गारले—

" पुअर सोल ! तुमच्या उपचारानीं हा बरा होईल असं वाटत तुम्हाला ? "

तम्मणाचार्य हंसले आणि उत्तरले —

" असे कैक रोगी मी बरे केले आहेत, डॉक्टर. "

● ● ●

# ६

पाडू मास्तरानीं बयोशी धरलेला अबोला दोन तीन दिवस तरी तसाच ताटकळत ठेवला असता कारण साऱ्या जगाशी मवाळकीनें वागणारे मास्तर बयोच्या बाबतीत मात्र एखाद्या लाडावलेल्या मुलाप्रमाणे हट्टीपणाने वागत. लोकाना बयोचें बडबडणें मात्र दिसे पण मास्तराचें तिढे वागणे दिसत नसे बयोची आदळआपट त्याना ऐकु येई, पण बाहेरच्या ओसरीवर शातपणे पुस्तकात तोंड खुपसून मास्तरानी आरभलेलें छळवादी उपोषण आणि जाचक अबोला मात्र कोणाच्या लक्षात येत नसे. पण हे सारें बयोपुरतेंच होतें कारण बयोवर त्याचा अमर्याद विश्वास होता, त्याची अपरपार प्रीति होती. आपला हटवाद ते तिच्यापुढे चालवणार नाहींत तर आणखी कोणापुढे ? लग्न झाल्यापासून तिनेंच त्याची मोठ्या मायेनें जपणूक केली होती, नव्हे काय ? जगाने केलेली कुचेष्टा ज्यावेळी मास्तराच्या जिव्हारीं झोंबत असे त्यावेळीं बयोच्या स्पर्शाने त्याना सजीवन लाभत असे. संभाविताच्या दुनियेचा मास्तराना मनातून अत्यत तिटकारा होता. लब्धप्रतिष्ठितानीं आपल्या विनोदाच्या फवाऱ्यात मास्तराना येता जाता किडामुंगीप्रमाणें घोळविलें असल्यानें, मास्तराना त्याच्या बोलण्याचालण्याची भीती बसली होती. म्हणून संभाविताच्या आणि लब्धप्रतिष्ठिताच्या वाटे-

पासून ते चार पावलें दूर राहात. म्हणून या दुनियेनें टाकावूं ठरविलेल्या मास्तराना बयोनें प्रेमानें जवळ केल्यावर आपला सारा दाबलेला राग मास्तरानीं तिच्यावर काढावा हे अगदी स्वाभाविक होते.

हा अबोला आणि हें उपोषण नेहमीप्रमाणे चार दोन दिवस टिकलें असतें. या दोन चार दिवसात आरंभीं बयोनें आदळआपट केली असती. त्यानतर रडूनभेकून घेतलें असतें. मग काकुळतीने विनवण्या केल्या असत्या, आणि अखेर बिनशर्त शरणागतीची पाढरीं निशाणे दाखविलीं असतीं आणि मग बयोच्या रूपानें साऱ्या जगानें आपल्याला शरणागति दिली आहे अशा खुषीत मास्तरानी सारें काहीं विसरून आपल्या व्रताचें पारणे फेडले असते.

पण आश्चर्याची गोष्ट अशी कीं मास्तराना या वेळेला इतकी वाट पहावीच लागली नाहीं. खरे म्हणजे हा अबोला दुसऱ्याच दिवशीं संपवून टाकायचा असे मास्तरानी स्वतःच ठरविले होतें. याचे कारण त्यानीं न रागावण्याची प्रतिज्ञा केली होती नव्हे काय? आपल्या मेंदूला एखाद्या अशक्त आणि किरकिऱ्या मुलाप्रमाणे जपण्याची त्याच्यावर आता जबाब-दारी येऊन पडली होती. तम्मणाचार्यांनीं सागितलेले उपचार त्याना ताबडतोब सुरूं करायचे होते. मग हें सारे बयोच्या सहकार्याशिवाय कसें शक्य होतें? पण त्याच बरोबर मास्तराना आपल्या व्यावींतून जे मुक्त व्हावें असें वाटत होतें, ते काही रिकामटेकडे चंगीभगीपणानें हिंडावे यासाठीं नव्हे. त्याना नाटकात काम करायचें होते. झुझाररावाची, फाल्गुनरावाची, धैर्यधराची, सुधाकराची, अशा कितीतरी भूमिका त्याना आपल्या कल्पने-प्रमाणे रगभूमीवर प्रत्यक्ष निर्माण करायच्या होत्या. आपल्या मनाशी या-बाबतीत आजवर त्यानीं फक्त विचार केला होता, आणि नुसते बेतच रचले होते. पण ते प्रत्यक्षात येऊ शकणार नाहीत या कल्पनेने हे विचार आणि हे बेत देखील एखाद्या क्षयरोग्याप्रमाणे आतल्या आत झुरणीला लागले होते. मनामध्यें उचंबळणाऱ्या प्रत्येक नव्या कल्पनेला सक्तीची जिवत समाधि मिळत असे. या भ्रूण-हत्येची मास्तराना इतकी सवय झाली होती कीं आपणावर कधीकाळी ही नव्या कल्पनाची भ्रूणहत्या थाबवण्याची

पाळी येणार आहे आणि त्याची प्रेमानें संगोपन करण्याची जरूरी निर्माण होणार आहे, याची त्याना शक्यताच वाटली नाहीं. ती शक्यता आता अचानक निर्माण झाली होती. म्हणून नाटककपनी काढण्यासाठी आपल्याला मिळालेले सारे पैसे खर्च करणें हें आपलें आद्य कर्तव्य आहे असे मास्तरांना वाटूं लागलें होते. मास्तरानी याच कारणासाठीं आपला रुसवा एक दिवस तसाच पुढें ओढून काढला

पण दुसऱ्या दिवशी संध्याकाळीं मास्तरानीं स्वतःवर उपचाराला आरंभ केला आहे किंवा नाही हे पाहण्यासाठी बाळूकाका जेव्हा घरीं आले तेव्हा त्याना दोघाचा एकमेकावरचा घुस्सा लक्षात आल्यावाचून राहिला नाही मग पाडू मास्तराना ते काही फार बोलले नाहीत. पण बयोला मात्र एकीकडे घेऊन त्यानी तिला बरेच काहीसे हलक्या आवाजात सागितलें, आणि मग बाळूकाका जाता जाता मास्तराना इतकेंच म्हणाले—

" पाडोबा, आता लहान पोरासारखा हट्ट करावयाचा द्या सोडून. "

आणि मग ते निघून गेले

मग बयो न बोलता स्वयपाक करू लागली स्वयपाक होताच तिनें तिघाचीं पानें घातली. जाई कुठेशी खेळत होती, तिला तिने बोलावून आणले आणि पानावर बसवले, आणि मग बाहेर येऊन मास्तराना जेवायला उठण्याविषयी तिनें त्याना विनती केली. पण मास्तर एखाद्या नाठाळ घोड्याप्रमाणे जागचे हलले नाहीत. मग बयो रागावली आणि तणतणूं लागली. तेवढ्यात तिच्या लक्षात काहीसें आलें, आणि मध्येंच ती गप्प बसली. ती अशी अचानक गप्प झालेली पाहताच मास्तरानी मान वर करून तिच्याकडे दृष्टि टाकली ती अपार कारुण्याने त्याच्याकडे पाहत होती. तिच्या दृष्टीत त्याची दृष्टि मिसळली आणि दोघेहि समजावयाचे ते समजले. बयोची दृष्टि आपल्यावर रोखली गेलेली आहे याची जाणीव होताच मास्तराच्या हातापायाची आणि ओठाची अधिकच वेडीवाकडी हालचाल होऊ लागली मग बयो तात्काळ आत गेली. तिने फडताळाचे दार उघडले. मामानी आणून दिलेली पैशाची थैली तिने बाहेर काढली आणि ती जाईच्या हातात देत तिला म्हटलें—

" जा, त्याना एवढी नेऊन दे. आणि सांग, झालें गेलें विसरून जा आणि जेवायला उठा. "

क्षणार्धात मास्तर स्वयंपाक घरात आले, पानावर बसले, आणि बयोला पाहताच गहिंवरले आणि मग इतका वेळ मोठ्या कष्टानें आवरून धरलेले अश्रू बयोच्या गालावरून ओघळले तिने डोळ्याला पदर लावला.

●●●

# ७

त्या दिवसानतर कोणत्याहि कारणाने आपल्या मनाला त्रास करून घ्यायचा नाही असा पाङ्क्र मास्तरानी स्वतःशींच जो निश्चय केला होता त्याचा कस लागण्यासारखे काही प्रसग घडले. आता बयो त्याच्याशी भाडणतंटा उकरून काढीत नसे. उलट ती त्याची मायेने जपणूक करीत होती. एखाद्या आजारी मुलाच्या कलाकलाने घ्यावें तसे ती त्याच्या बाबतीत घेत होती, तेव्हा तिच्याशीं भाडण होण्याचा प्रश्नच नव्हता किंत्येक वेळा तिच्या आवाजात जरा कठोरपणा येत असे हे काहीं खोटे नाही पण ती किंचित् रागावलीच तर केवळ मास्तराच्या प्रकृतीच्या कारणावरून रागावत असे. तम्मण्णाचार्यांनी लिहून दिलेल्या उपचाराच्या साऱ्या बाबी ती त्याना अगदी काटेकोरपणानें पाळायला लावीत असे. त्यात चुकारपणा झालेला तिला बिलकूल खपत नसे सकाळचें सूर्यस्नान, दुपारी कृष्णाबाईचे स्नान, योग्य वेळीं जेवण, रगीत बाटल्यातून मधून मधून घ्यावयाचे पाणी, दिवसातून तीन वेळा औषधी तेलानी हातापायाचे करावयाचे मर्दन, संध्याकाळीं सहल, इत्यादि अनेक गोष्टी बयो एखाद्या कटकटी मुकादमाप्रमाणे त्याच्याकडून करून घेऊ लागली. या सगळ्याना पुरून उरलेलें मास्तर नाटक कपनीचा प्रपच उभारण्याच्या गडबडीत होते.

मास्तराच्या हवाली केलेले पैसे मातीमोल होणार याची बयोला खात्री होती. ते पैसे दामदुपटीने घरीं परत आले पाहिजेत, असें छोटूमियाचे भविष्य होते या भविष्याबद्दल मास्तराना काहीं विशेष पोटतिडीक होती असे नव्हे एखाद्या नवख्या लेखकाला आपले लिखाण छापून येण्याच्या आनंदापुढे मोबदला मिळाला नाहीं, याची मातब्बरी वाटत नाही, तसला उत्साह मास्तराच्या अगीं सचारला होता त्यामुळेच घरातून दररोज पाच-पंचवीस रुपयाच्या रकमेने बाहेर चाललेली ही लक्ष्मी पुन्हा कधी घरी परतणार नाही अशी बयोची खात्री झाली होती पण बयोलाहि पैशाचा विशेष लोभ होता असेहि नव्हे. आपल्या छोट्या ससारात खायला दोन घास आणि ल्यायला दोन कपडे भरपूर असावेत, अशी स्त्रीसुलभ नैसर्गिक इच्छा तिला होती. मास्तराचा हटवाद पाहिल्यावर तिने त्याना सर्व प्रकारे सागून पाहिले आणि मग पैसे त्याच्या हवाली करताना त्याना अशी अट घातली कीं, मास्तरानीं स्वतः नाटकात काम करण्याच्या फंदात पडता कामा नये. कोणत्याहि कारणानें रात्रीचें जाग्रण त्यानी आपल्या अगावर ओढवता कामा नये मास्तरानी या अटी मान्य केल्या, आणि खरोखरीच ते त्याप्रमाणे वागू लागले.

मग मास्तराचे अनेक बेत कुभाराच्या चाकावरच्या मातीप्रमाणे आकार धरू लागले रोज सकाळी आणि सध्याकाळीं छोटूमियाच्या गिरणींत त्याची बैठक होऊ लागली मनसुबे रचले जाऊ लागले त्याच्या भोवतीं हौशी आणि धदेवाईक नटाचा घोळ जमू लागला निरनिराळ्या नाटकाची नावे पुढे येऊ लागली पण ती खर्चाच्या दृष्टीने परवडण्यासारखी नसल्याने बाजूला सारावी लागली. अखेर 'सशयकल्लोळ' सारखें एक साधे, सामाजिक नाटक निश्चित करावें लागले मास्तराच्या मनात झुझारराव नाटक रगभूमीवर आणावयाचे होते, पण त्याला लागणारे देखावे, कपडालत्ता आणि एकदरीत त्यासाठी आवश्यक असलेली रगभूमीची सजावट मास्तराच्या कपनीला झेंपण्यासारखी नव्हती कारण हा प्रपच फक्त मास्तराच्या पैशावर चालत होता. बाकी छोटूमिया आणि इतर उपरे नट, सल्लागार मडळ स्थापल्याप्रमाणें मास्तराना वेळीं अवेळी 'गोष्टी सागेन

युक्तिच्या चार ' ही भूमिका इमानेइतबारें पार पाडीत होते

नाटकासाठीं स्त्रीपात्राची निवड हा मास्तराच्या पुढें एक अडचणीचा प्रश्न निर्माण झाला होता. लोकाना स्त्रीपात्राचीं कामें पुरुषानी केलेलीं आता रुचण्यासारखी नव्हतीं. शिवाय पूर्वीप्रमाणे कोवळ्या चेहऱ्याची तरणी पोरें मिळणेहि कठीण होतें. चारदोन लब्धप्रतिष्ठित ' कुलीन स्त्रियानीं रंगभूमीवर पदार्पण केले पाहिजे ' असें ठासून सागत असले, तरी या दिशेने कोणीहि गरती बाई नाटकात काम करण्यासाठीं पुढे येईल, याची निदान या गावात तरी शक्यता नव्हती. ज्या स्त्रिया नाटकात काम करण्यासाठी म्हणून पुढे येत त्या नाटकात काम करण्यालायक नसत. त्यापैकी कोणी पतित होत्या, कुणाचे चारित्र्य कलंकित झाले होतें, तर कुणाला परित्यक्तेचें जिणे कठावें लागत होतें. थोडक्यात म्हणजे या अशा स्त्रियाचीं नाटकात काम करण्यानें विशेष अब्रू जाण्यासारखी नव्हती म्हणून त्या येत होत्या. नाटकात काम करण्यासाठीं माणसाजवळ काहीं लायकी लागते याची त्याना जाणीवच नव्हती असली काहीं पात्रे छोटूमिया रोज मास्तराच्या पुढे आणून उभीं करीत असे, आणि वधूपरिक्षेच्या थाटात तपासणी करून मास्तर नापसतीचा शिक्का मारीत असत अखेर नाटकातील दुय्यम स्त्रीभूमिकासाठीं काहीं स्त्रिया कशाबशा मिळाल्या. पण नायिकेच्या कामाला योग्य अशी एकहि स्त्री पुढे येईना. अशा रीतीने नमनाखालींच घडाभर तेल खर्च होऊ लागलेले पाहून छोटूमिया कटाळला आणि एक दिवस मास्तराना म्हणाला—

" मास्तर, या गावातली एकहि बाई काही तुम्हाला पसत होईल असे वाटत नाहीं मला मुबईहून बड्या पगारदार नटी आणल्या तरच तुमच नाटक उभारण्याचीं लक्षण दिसतात मला "

" तसं नव्हे रे छोटू " मास्तर म्हणाले—" या नटाची निवड करताना आपण किती चोखदळपणा दाखविला आहे ! आपण निवडलेल्या नाटकातील रेवतीसारखी महत्त्वाची स्त्रीभूमिका करणारी स्त्री तरी निदान ठाकठीक असायला नको का ? "

छोटूमिया त्यावर विडीचा झुरका घेत बराच वेळ विचारमग्न झाला

आणि मग मास्तराच्या पाठीवर थाप मारून म्हणाला—

" मास्तर, एक झकास आयडिया सांगूं? पण प्रत्यक्ष जमणं जरा कठीण आहे बुवा ! पण जमली तर अशी बहार होईल म्हणता—"

" पण काय आहे तें तर ऐकू दे. " पाडू मास्तरानी उत्सुकतेने विचारलें.

छोटूनें विझलेली विडी पुन्हा शिलगावली आणि एक दम मारून म्हटलें—

" आपल्या कमिटीच्या तलावाजवळ ती हिरवी बगली पाहिली आहे ना तुम्ही ?"

मास्तरानी बावचळलेल्या मुद्रेनें मान डोलविली. पण खरें म्हणजे त्यानीं पाहिली नव्हती. हीच नव्हे तर गावातल्या कोठल्याहि इमारतीबद्दल त्याचे असेंच झाला होतें. ते आपल्या घराच्या गल्लीतून कैक वेळा आले गेले असतील. पण या गल्लीचे वर्णन काही त्याना सागता आले नसतें. छोटूने मास्तराची मनःस्थिति हेरली असावी. तो म्हणाला—

" तुळशी राहते पहा त्या बंगलींत ? मुंबईच्या बिहारीलाल शेटजीनीं ठेवलेली बाई ? आलं का लक्षात तुमच्या आता तरी ? "

मास्तरानीं पुन्हा मान डोलविली. पण खरे म्हणजे त्या बाईचें चार-दोन टवाळखोराच्या बोलण्यात नाव ऐकण्यापलिकडे त्यानीं काहीं फारसें ऐकले नव्हतें छोटू म्हणाला—

" बाई अशी फर्मास आहे म्हणता...तिचं नाव ऐकताच ढीगभर गल्ला जमा होईल नाटकाच्या वेळी. "

" गल्ल्याचं राहू दे. पण नाटकात काम करण्यासारखे काही गुण आहेत का तिच्यामध्यें. "

" ते तुमच तुम्ही ठरवा बुवा. असें करा ना, संध्याकाळी तुळशी या गिरणीवरून कालिकेच्या दर्शनाला जात असते. आज संध्याकाळीं तुम्ही इथं येऊन बसा. प्रत्यक्ष आपल्या डोळ्यानीं पहा तिला आणि ठरवा काय ठरवायच तें. "

मास्तर त्या दिवशी संध्याकाळी छोटूमियाच्या गिरणीच्या दरवाजाशीं

रेलून उभे राहिले होते. त्याची नजर रस्त्यावर होती. पण त्याचे मन झुंजाररावाच्या भोंवती भ्रमत होतें. इतक्यांत मध्येंच केव्हा तरी छोटूमियानें त्याना एकदम ढोंसलें आणि म्हटलें—

" तुळशीबाई ! "

त्याबरोबर मास्तर दचकले आणि समोर पाहूं लागले.

रस्त्यातून संथ पावलानी तुळशी चालली होती. मास्तराच्या अंगावरून ती पुढें गेली तिच्याबरोबर तिची नोकराणी सोबत करीत होती. मास्तरानीं तिला पाहिले त्यावेळी नोकराणीच्या बोलण्यावर ती प्रसन्नपणें हंसत होती. त्यामुळें त्या प्रसन्न हास्यानें तिचें शीतल लावण्य क्षणभर उजळल्यासारखें झाले. ती समोरून निघून गेली तरी कितीतरी वेळ मास्तर तिच्या पाठमोऱ्या आकृतीकडे मंत्रमुग्ध होऊन पाहत होते. तिची रेखीव अंगलट, तेजस्वी गौरकांती, टपोरे भावुक डोळे याचा पाहणाऱ्याच्या मनावर ठसा उमटावा असेंच तिचें लावण्य होतें. तिच्या मुखावरील कोमल भाव पाहून या स्त्रीचे मन देखील असेंच कोमल असलें पाहिजे अशी बघणाऱ्याला खात्री पटावी ! तुळशीनें अगदी साधी वेषभूषा केली होती. त्यात नटवेपणा किंवा छटेलपणा याचा अंशहि नव्हता. पानपट्टीच्या दुकानासमोर दोन चागल्या पोशाखातले इसम पानासाठीं तिष्ठत उभे होते त्यापैकीं एक दुसऱ्याला सागत होता.

"...नायकीणीच्या कुळात जन्माला आली म्हणूनच हिला नायकीण म्हणायची. आज पाच वर्षे बाई एकटी राहते आहे इथ यजमान सणासुदीला कधी तरी उगवतो आणि जातो, पण बाईच्या बगल्यावर एकहि छटेल माणसाच पाऊल कधीं वळलेल आढळल नाहीं "

" आणि गाणे तरी काय गाते म्हणता ! केव्हाहि बगल्यावरून जा. तम्बोऱ्याच्या तारांचा झंकार कानीं पडला नाहीं असें व्हायच नाहीं. "

मास्तरानीं वळून त्याच्याकडे पाहिले, तेवढ्यात पानाचा तोबरा भरीत ते इसम तेथून चालते झाले. मास्तराची मुद्रा विचारमग्न झाली. त्याच्या डोळ्यात कसलीं तरी स्वप्ने तरळूं लागली.

छोटूनें मास्तराना पुन्हा एकदा ढोंसलें. आणि म्हटलें—" कसला

विचार करताय् मास्तर ? ”

मास्तर खिन्नपणें हसले आणि म्हणाले—“ निसर्गाची किमया पाहतों आहे मी. या लावण्यमयीला तुळशी हे नाव किती शोभून दिसतय् नाहीं का ? ”

“ नावाशी आपल्याला करायचं आहे काय ? पाखरू मोठ गिऱ्हाईक आहे कीं नाही ते सांगा. ”

त्याबरोबर मास्तर एकदम भडकले. संतापाने त्याचे ओठ थरथर कापू लागले. अशा सौंदर्याचा अमंगल अपमान करणाऱ्या छोटूची निर्भर्त्सना करण्यासाठी त्वेष अंगागातून उसळूं लागला. पण इतक्यात मास्तराना आठवलें कीं आपल्याला रागावून चालणार नाही मग त्यानी क्षणभर डोळे मिटले आणि झुंझाररावाच्या कमळजाचें रूप डोळ्यासमोर आणलें. ती कमळजा हुबेहुब तुळशीसारखी होती ! आणि या तुळशीच्या चेहऱ्यावरचा निष्पापपणा, निरागसपणा, आणि त्या चेहऱ्यावरचे तेज कसे जाईसारखें होते ! मास्तराना जाईची आठवण झाली आणि मंद वाऱ्याच्या झुळुकेने दिवा मालवावा तसा त्याचा राग विझून गेला मग ते छोटूला इतकेंच म्हणाले—

“ छोटू, असलं बोलणं मला बिलकूल खपणार नाहीं. अशा माणसाची प्रतिष्ठा आपण नाही राखली तर दुसरा कोण राखणार ? ”

मास्तराच्या बोलण्यावर छोटू चपापला आणि मग दुसराच काही एक विषय काढून त्याच्याशीं बोलू लागला मग दुसऱ्या दिवशी सकाळीं मास्तरानी स्वतःच तुळशीला भेटायला जाण्याचे त्याच्या बोलण्यामधून ठरले. मास्तर घरीं जायला निघण्यापूर्वी छोटूने हलकेच नाटकाच्या प्रारंभिक कच्च्या खर्चासाठीं म्हणून मास्तराच्याकडे शंभर रुपयाची मागणी केली. मास्तरानीं विशेष आढेवेढे न घेता बरोबर आणले होते तेवढे पैसे त्याला दिले आणि उरलेले पाठवून देण्याचे कबूल केलें मास्तराची पाठ वळताच छोटूमिया आपल्या दोस्ताना घेऊन मजा मारण्यासाठीं कोठेसा चालता झाला!

● ● ●

# ८

मास्तर घरी आले तेव्हा बयो त्याच्या उशीरा येण्याबद्दल रागावली होती ती म्हणाली—

" पोरगी वाट पाहून पाहून गेली तुमची "

" गेली ? कुठं गेली ? "

" अहो, नाटक नाहीं का तिचं आज ! "

" खरंच विसरलों मी " अपराधी आवाजात मास्तर म्हणाले—"कुठं, दोन नंबरच्या शाळेत आहे ना नाटक ? आत्ता जाऊन येतों मी "

" निघालात कुठं ? काही जेवणखाण ? बायकोला बरोबर न्यायची काही शुद्ध बुद्ध ? तुमच्या सारखींच माझीहि ती मुलगी आहे म्हटलं ! "

मास्तर त्यावर मन:पूर्वक हसले मग त्या दोघांचे जेवण झाले मास्तरांचें जेवणाकडे लक्षच नव्हते गडबडीने केव्हा एकदा नाटकाच्या जागी जाऊन पोहोचतो असे त्याना झाले होते परगावीं जायला निघालेल्या लहान मुलाचे उतावळेपणापायीं जेवणाखाण्यात लक्ष नसावे तसे मास्तर उतावळे आणि अधीरे झाले होते शेवटचा भात त्यानीं अक्षरश ओरपला होता पण आचवण्यासाठीं पानावरून ते उठत असताना बयोने त्याना त्याच्या नाटकाबद्दल काहींतरी विचारलं ते सागत असताना मास्तर स्थलकालाचें

भान विसरले, आणि बराच वेळ बयोचें जेवण होईपर्यंत ते खरकट्या हातानें तिच्याशीं बोलत तिष्ठत उभे राहिले जेवण आटोपल्यावर बयोनें गडबडीनें झाकापाक केली, आणि मास्तराच्या पाठोपाठ घराला कुलूप लावून ती बाहेर पडली.

मास्तर पुढें चालले होते आणि बायकोला साजेलसें अतर ठेवून बयो पाठीमागून चालत होती. चालत होती म्हणण्यापेक्षा तीं दोघें पळत सुटलीं होती, असें म्हणणे अधिक योग्य होईल. दोन नबरच्या शाळेपाशी पोहोंचताच मास्तराना न विचारता बयो बायकाच्या गर्दीत घुसली आणि भाडणतंटा आणि धक्काबुक्की करीत थेट पडद्यापाशीं जाऊन बसली. आजूबाजूच्या बाया तिच्यावर बऱ्याच तणाणल्या. पण बयोनें तें मनावर न घेता आपली मुलगी या नाटकात काम करणार आहे, भक्त ध्रवाच्या कामात ती देवासारखी कशी दिसते, ती भाषणें घडाघडा कशी म्हणून दाखविते इत्यादि गोष्टी रसभरितपणें आजूबाजूच्या साळकायामाळकायाना सागितल्या. ती आणखी काहींतरी सागणार होती. पण तेवढ्यात नाटकाची तिसरी घटा झाली. पडदा वर जाऊं लागला आणि त्या सभागृहात प्रेक्षकाच्या चिक्कार गर्दींत शात राहण्यासाठीं आरडाओरडा सुरू झाला.

बयो ज्या जहाबाजपणें दगामस्ती करीत बायकाच्या गर्दीतून वाट काढीत आत शिरली, त्याचें मास्तराना भारी कौतुक वाटलें. कारण नाटकाला एक शब्दहि पाहायचा अगर ऐकायचा चुकता कामा नये हा आपला कटाक्ष ती जाताना सारखा बोलून दाखवीत होती तिच्या मनातले नाटकाचे हे जबरदस्त आकर्षण पाहून मास्तराना मौज वाटली होती. मात्र असें करताना हीच बयो मास्तराना त्याच्या नाटकाच्या वेडाबद्दल येता जाता टोकरून बोलण्यास कमी करीत नव्हती. मास्तर संथ पावलानी त्या पत्र्याच्या माडवाच्या मागें जाऊन सर्व प्रेक्षकाच्या पाठीमागच्या बाजूने आपल्याला कुठे प्रवेश मिळतो आहे कीं काय तें पाहूं लागले. पण माणसाची ठेचाठेच इतकी झाली होती, कीं आत अडकून पडलेल्या शाळेच्या मुख्याध्यापकाना मघापासून बाहेर कसे यावें हा प्रश्न पडला होता. मग मास्तराना आत कोण जाऊ देणार? तेवढ्यांत नाटक सुरू झालें. मास्तर प्रेक्षकाच्या मागेंच कोठेसे

गर्दीत उभे राहून टाचा उंचावून पाहूं लागले. राजकुमाराच्या नेत्रदीपक वेषभूषेत जाईनें रंगभूमीवर प्रवेश केला. मोठ्या डौलात हावभाव करून ती संवाद बोलूं लागली त्या संवादांतील आशय किती सहजतेनें तिच्या मुखावर झरझर उमटत होता! अभिनयाच्या कांहीं काही अवघड जागा तिनें सर्कशीतल्या एखाद्या कसलेल्या खेळाडूप्रमाणे अगदी सहजतेने घेतल्या. मास्तर तसेंच तिष्ठत कोंबड्यासारखी मान उंचावून, मध्येच कुणाचे डोकें आल्यास शेजारच्या इसमाच्या खांद्यावर बेदिक्कत हात ठेवून, किंचित् उडी मारून नाटक पाहण्यात एकरूप झाले होते. तोंच कुणीतरी त्याच्या पायावर आपला बुटाचा पाय बेदिक्कतपणें ठेवला मास्तर कळवळले. त्याच्या अस्फुट ओरडण्याबरोबर त्याच्या शेजारच्या सूटबूट घातलेल्या लठ्ठ इसमाने आपला पाय उचलून घेतला इतकेंच, पण पाय चोळण्यासाठी मास्तर किंचित् मागे सरले आहेत असें पाहून तो इसम पुढे घुसला आणि पलिकडच्या इसमाच्या खांद्यावर हात ठेवून मान उंचावून नाटक पाहू लागला. एरवी या विचित्र प्रकाराला सुबुद्ध माणसांनी अन्याय असे नाव दिले असते धान्या-साठी उभ्या असलेल्या रांगेत अगर आगगाडीतल्या डब्यात जर असा प्रकार घडता, तर अशी मस्ती करून पुढे जाणाऱ्या इसमाचा लोकांनी चांगलाच नक्षा उतरवला असता पण मांडवात जमलेल्या प्रेक्षकांना नाटकाची अशी कांहीं नशा चढली होती, कीं प्रत्येक जण त्या धुंदीत धक्काबुक्की करीत पुढे जाण्याचा प्रयत्न करीत होता झगझगीत दिव्यांनी झगमगलेल्या रंगभूमीच्या जवळ जाण्यासाठी जो तो धडपडत होता दिव्यावर झेप घेणाऱ्या पतंगाप्रमाणें या गर्दीतून वाट काढीत पुढें पुढे घुसणाऱ्या प्रेक्षकाची मनःस्थिति झाली होती म्हणून ती धक्काबुक्की कोणी मनावर घेत नव्हता. आपला जन्मसिद्ध हक्क असल्याप्रमाणे मागचीं माणसे पुढच्या माणसांना कोपरखळ्या देऊन पुढे जात होतीं. जाता जाता तणतणत होतीं आणि क्षणार्धात तें विसरून रंगात येऊन एकमेकाच्या पाठीवर थापा मारीत बातचीत करीत होती.

बुटाचा पाय पडल्याने कळवळलेले मास्तर मांडवाच्या एका वाशाचा आधार घेऊन दुसऱ्या अंकाच्या आरंभीं किंचित् वर चढून नाटक पाहू

लागले होते, तोंच त्याना कुणी हाकारलें. त्याबरोबर मास्तरानीं टुणकन् उडी मारली. मास्तरानीं वळून पाहिलें तों बयो त्याचा शोध घेत येत होती. मास्तराना पाहताच ती म्हणाली—

" मला मेलीला ध्यानात नाहीं, पण तुम्हाला तरी ? खुशाल उड्या मारून नाटक पाहत उभे राहिला आहात ! जागरण करायच नाही हें माहित नाहीं वाटत ? ही किल्ली घ्या आणि घरीं जाऊन झोपा आता. "

मास्तर हसले आणि किल्ली घेत म्हणाले—" आणि तू ? "

" नाटक कस छान चाललंय ! तें टाकून तुमच्याबरोबर यायला काय खूळ लागलय काय मला ? "

मास्तरानीं जाण्यासाठीं पाठ वळविली तोंच बयो पुन्हा खेकसून म्हणाली-

" अहो, असे चाललात कुठ ? आत जाऊन जरा पोरीचं कौतुक कराल कीं नाही ? त्या पडद्यामागच्या बाजूच्या खोलींत पोराचे आईबाप सारखे येऊन जाताहेत. दहा वेळा मघापासून पोरीनं तुमची आठवण काढली "

" तूं रंगपटापर्यंत थडकून आलेली दिसते आहेस ! "

" मग ? मला कोण अडवणार आहे ? चला माझ्याबरोबर ! मी नेतें तुम्हाला "

—आणि खरोखरीच बयोने गर्दीतून वाट काढीत मास्तराना सुखरूप रंगपटापर्यंत नेलें. आपलें काम आटोपून जाई नुकतीच परत रंगपटात येत होती. तिचें कौतुक करण्यासाठी काही प्रतिष्ठित माणसें तेथें उभी होतीं. रंगपटाच्या दारातून मास्तरानी जाईला पाहिली, आणि पाहता पाहता ते जळणाऱ्या मेणबत्तीच्या वरून ओघळणारें मेण मध्येच थिजावें तसे थिजल्यासारखे झाले. त्याना पाहताच जाई धावत धावत त्याच्याकडे आली. जाई ? छे ! पचवीस वर्षांचा अमर्याद भूतकाळ ओलांडून बालनट पाडू त्याच्याकडे धावत येत होता. तसेंच गोजिरे रूप, तीच वेशभूषा, तेंच मुद्रेवरील तेज आणि तेच रंगपटातील वातावरण ! जाईनें मास्तराच्या कमरेला विळखा घालताच मास्तर भानावर आले त्यानी तिला उचलून घेतलें. आणि मग बरेचसे कौतुक करून घेऊन जाई पुन्हा रंगभूमीकडे जायला निघाली तोंच सहजगत्या मास्तराचें लक्ष तिच्या रंगभूषेकडे गेलें. त्याच्यातला रंग-

भूषाकार जागृत झाला. त्यानीं जाईला परत हाक मारली आणि तिला प्रकाशात उभे करून ते चोखदळ दृष्टीनें तिच्याकडे पाहू लागले तिच्या रंगभूषेंतील ढोबळ चुका त्याच्या लक्षात आल्या, पण त्याचा विशेष गाजा-वाजा न करता त्यानीं तिला आरशाजवळ' नेले जवळच तयार केलेले रग तसेच उघडे पडले होते मग त्यानी रंगाचे कुचले उचलले आणि बघता बघता तिचे रूप बदलून टाकले. पाहणाऱ्या चार दोन प्रतिष्ठित गृहस्थानीं देखील मग असे उद्गार काढले की ही अधिक तेजस्वी आणि मोहक दिसूं लागली आहे तेवढ्यात रंगभूमीवरून तिला कोणीसें हाकारलें आणि मग जाई निघून गेली बयोहि परत बायकाच्या गर्दीतून वाट काढीत कोठे नाहींशी झाली. मास्तर जड पावलानी शाळेच्या आवाराच्या बाहेर पडले दूरवरून त्यानी मागे वळून पाहिले शाळेच्या आवारातील तो माडव, हजारो प्रेक्षकाचें तिष्टत उभे राहण्याचें ते वेड आणि त्याना वेड लावणारी ती रगदेवता त्याना तेथूनहि दिसू शकत होती. जाईची मूर्ति त्याच्या नजरेसमोरून हालेना. त्याच्या जीवाची तगमग होऊं लागली. इतक्यात त्याना आठवले कीं आपल्या डोक्याला असा त्रास करून घेऊन चालणार नाही.

● ● ●

# १

सकाळच्या कोवळीं उन्हें रखरखीत होण्यापूर्वी मास्तर तुळशीच्या बंगल्यासमोर येऊन दाखल झाले. बंगल्याच्या फाटकातून त्यानी भीतभीत आत प्रवेश केला. दारातच पारिजातकाचे झाड होते सारवलेल्या जमिनीवर लालुग्या देठाच्या शुभ्र फुलाचा सडा पडला होता बगलीतून तंबोऱ्याचा झंकार आणि मधुर आवाजात आळविलेले जीवनपुरीचे स्वर त्याच्या कानीं आले, आणि क्षणभर मास्तर तियेच थबकून उभे राहिले. तेवढ्यात दारातून नोकराणी बाहेर आली मास्तराना पाहताच तिला विलक्षण विस्मय वाटला. मास्तरानी बाईची भेट घेण्याची इच्छा प्रदर्शित केली मग नोकराणी आत गेली आणि तिने बाईना वर्दी दिली. मग ती पुन्हा बाहेर आली मास्तराना आपल्याबरोबर चलण्यासाठी तिने खुणावले. बुजऱ्या मनाने मास्तर तिच्या मागोमाग वर दिवाणखान्यात गेले. मास्तराना पाहताच तुळशीनें प्रसन्नपणें हंसून किंचित् लवून त्याना अभिवादन केलें, आणि आणि समोरच्या एका कोचावर बसण्यास विनविलें. तुळशी स्वतःच तंबोरा घेऊन गायनासाठी बसली होती. तिच्यासमोर तिला तालीम देणारे जराजीर्ण खासाहेब बसले होते. खासाहेबाच्या आवाजीत कंप होता. ते रेकून गात होते. जणूं स्वराशीं त्याची झटापट चालली होती. रागाचें रहस्य विशद

करून सागता सागता खासाहेब रगात आले होते आणि काहीं एक स्वरालाप सहज घेण्याचा ते प्रयत्न करू लागले. पण नेमक्या याच वेळीं वृद्धत्वानें थकलेला त्याचा आवाज एखाद्या नादुरुस्त झालेल्या यत्राप्रमाणें अडून बसला. घशातून हवे ते स्वर उमटेनात, आणि उमटलेले स्वर हे गोते खात खालीं येणाऱ्या पतंगाप्रमाणें बदसूरपणें पडू लागले. खासाहेबाना हवे असलेले स्वर त्याचे हात दर्शवू लागले, आणि डोळ्यातून ओसडू लागले. पण घसा सरळ साऱ्या पड्जाची देखील साथ करीना. खाकरून खोकरून, घशाला ताण देऊन, छातींत उसना दम घेऊन, खासाहेबानी एखाद्या पहिलवानाप्रमाणें झटापट चालविली पण थकलेल्या आवाजातून काहींच निष्पन्न होईना. खासाहेब चिडले, सतापले, हट्टाला पेटले आणि अखेर अगतिक झाले. त्याच्या डोळ्यातून अश्रुधारा वाहूं लागल्या. मग तुळशीने तबोरा खाली ठेवला आणि मायेनें ती त्याना म्हणाली—

"खासाहेब, नका आता कष्ट घेऊ. जन्मभर या आवाजान तुम्हाला साथ दिली. वृद्धपणीं नका आता त्याचे हाल करूं."

खासाहेबानी डोळे टिपले आणि म्हटले—

"खुदाकी मर्जी! आज आवाजी लागत नाहीं. शरीरातल्या गात्रानींच बंड पुकारलें. अफसोस"—

खासाहेबाची तगमग मास्तराना बघवेना. पण असली दुःखे उघड्या डोळ्यानीं पहावीत, आणि तीं आपल्याला निवारता येऊ नयेत, म्हणून मनातल्या मनात असहाय व्हावें हा माणसाला शापच मिळाला आहे, असें मास्तराना वाटलें. बसल्या जागींच मास्तराचीं बोटें वेडींवाकडीं होऊं लागलीं. पाय थरथरू लागले आणि मग मास्तर भानावर आले. मन शात करण्यासाठीं ते खिडकींतून दुसरीकडे पाहू लागले. तुळशीनें खासाहेबाना निरोप दिला आणि मग मास्तराच्याकडे वळून ती हसून म्हणाली—

"बोला, काय काम आहे तुमच?"

मग मास्तरानी आपला येण्याचा उद्देश सविस्तर कथन केला. तुळशी शातपणें त्याचें बोलणें ऐकून घेत होती. मधून मधून काहीं शका विचारीत होती. मग तिनें नाटकाची चौकशी केली. कोण कोण माणसें काम करणार

आहेत याची माहिती घेतली. अशी माहिती घेताना तिनें स्वतःच्या नाटकाच्या आवडीबद्दल खूपखूपसें सांगितले. आपले पूर्वीचे काहीं अनुभवहि सांगितलें. नाटकाच्या व्यवहारात पूर्वी लोकांनीं आपल्याला कसें फसविलें त्याचाहि तिनें उल्लेख केला. पण हा उल्लेख करीत असताना मास्तरांची मुद्रा किंचित् गोरीमोरी झाली आहे, असें पाहताच तिनें आपल्या विधानाला पुस्ती जोडून असें म्हटलें, की पैसे बुडविणारीं पूर्वीचीं माणसें निराळीं होतीं. मास्तरांच्या बद्दल संशय घेण्याचें तिला काहींच कारण नव्हतें मग ती म्हणाली कीं, पैशासाठी आपण काम करावें अशी आता तिची परिस्थितीहि उरली नव्हती. ती ज्या यजमानाजवळ नांदत होती तो बडा श्रीमान् गिरणीमालक होता. अशा रीतीनें तुळशी एकटीच कितीतरी वेळ बोलत राहिली होती. राजघराण्याच्या प्रतिष्ठेसाठीं सक्तीच्या एकांत-वासात ठेवलेल्या राजकन्येला जिव्हाळ्याचें माणूस भेटल्यानंतर ती जशी प्रस्तुत-अप्रस्तुत गोष्टी बडबडत सुटते, तशी तुळशी बडबडत सुटली होती. ती म्हणाली कीं नाटकात काम करण्यासाठीं रुकार देण्यापूर्वी तिला आपल्या यजमानाची संमति घेतली पाहिजे. त्यात अडचणीचा भाग एवढाच होता कीं तो तुळशीकडे वर्षातून कधीं तरी येऊन जाई. असें नेहमीं नेहमीं येणें व्यवसायाच्या व्यापामुळें त्याला जमण्यासारखें नव्हते शिवाय—आणि हें सांगताना तुळशीची मनःस्थिति मोठी भांबावल्यासारखी झाली. जें सांगू नये तेंहि ती बोलून गेली. तिच्या यजमानानें मुंबईतहि काहीं बायका ठेवल्या होत्या. हें सांगताना एक अनामिक दुःख अगदीं साध्या शब्दांत भळाभळा वाहिल्यासारखे मास्तरांना वाटलें. पण तेवढ्यात तुळशीने स्वतःला सावरलें तिनें आपल्या यजमानाच्या मायाळूपणाच्या अनेक गोष्टी सांगितल्या. आणि आधीं यजमानाची संमति विचारण्याची अगदीं जरूरीच आहे असेंहि नाहीं, असें ती बोलून गेली. नुसतें पत्रानें कळविलें तरी चालण्यासारखें होतें. तुळशी तेच करणार होती. तिचें हें सारें बोलणें मास्तर शांतपणें ऐकत होते. तिच्या बोलण्यातला निष्पापपणा, मनाचा सरळपणा, बरेंचसे सांगण्याची घाई गडबड आणि त्यामुळें आशय लपविण्यासाठीं उडालेली तारांबळ, इत्यादि अनेक गोष्टी मास्तरांनीं मार्मिकपणें पाहिल्या, आणि

त्याच्या मनात आलें कीं ही बाई ‘ झुंजारराव’ नाटकात कमळजाचें काम खरोखरीच अप्रतिम करील.

मग मास्तर तिचा निरोप घेऊन उठू लागले. तेवढ्यात तिनें त्याना हलकेच एक अवघड प्रश्न केला. तिनें विचारले की हल्लींच्या दिवसात नाटक-व्यवसायासारख्या बुडीत धंद्यात स्वतःचे भाडवल गुतवणारा असा मूर्ख माणूस मास्तराना भेटला तरी कोण ? मास्तर त्यावर खिन्नपणें हंसले आणि म्हणाले—

“ तुम्हाला पहायचा आहे का तो माणूस ? काहीं फार लाब जायला नको. तुमच्यासमोरच तो उभा आहे ! ”

या उद्गारानें तुळशी दचकली, भांबावली, आणि बोलण्याला दुरुस्ति सुचविता सुचविता तिची तारांबळ उडाली. मग मास्तर म्हणाले की पैसा मिळेल या अपेक्षेनें त्यानीं हा व्यवसाय आरंभिला नव्हता. कारण पैशाचें आणि त्याचें जन्मजात शत्रुत्व होतें. दारिद्र्यात दिवस उगाळण्याची त्याना आता सवय झाली होती. त्यामुळें त्याना आतां श्रीमती मानवण्यासारखी नव्हती. आपल्याला अचानक मिळालेल्या पैशाची हकीकत मास्तरानीं सागितली. फारा दिवसाचें एक सुखस्वप्न साकार करण्याची शक्यता निर्माण झाल्यानें आपण आपले सर्वस्व कसें वेचीत आहोत तेंहि त्यानीं तिला सागितले. मग मास्तरानीं तिचा निरोप घेतला. आणि ते जाऊ लागले. तुळशी दारा-पर्यंत त्याना पोंचविण्यास आली. अंगणात वाऱ्याच्या झुळकीनें खालीं पडलेली पारिजातकाची चार फुले तिने उचललीं आणि मास्तराच्या पुढें करीत बुजरेपणानें म्हटलें—

“ माझ्याकडून ही एवढी भेट घ्याल का ? ” या साध्या प्रश्नात पायदळी तुडविलेली प्रतिष्ठा अगदी सहज उतू गेल्यासारखी दिसली.

मास्तरानीं तीं फुले घेतलीं, नाकाजवळ नेलीं. आणि क्षणभर प्रसन्नपणें त्यानी तीं हुगलीं, आणि मग जाईला तीं फार आवडतील याची त्याना आठवण झाली. त्यानीं तीं फुलें नीट थरथरत्या हातानीं रुमालात बाधून घेतली, आणि फाटकातून बाहेर पडून रस्त्यातून ते तरातरा चालू लागले. कधीं प्रसंग पडलाच तर कमळजाचें काम तुळशीला देताना तिच्याकडून ही

भूमिका कशी सरस वठवून घेता येईल याचे विचार त्याच्या मनात घोळूं लागले.

आणि मग नेहमींच्या बेहोषीत मास्तर रस्त्यातून लगबगीने जाऊ लागले. घरीं जाऊन त्याना अजून बरीच आन्हिकें उरकावयाचीं होती अजून सूर्य-स्नानासाठी त्याना उन्हाला पाठ देऊन बसायचें होते त्यानंतर औषधी तेलानीं हातापायाचे मर्दन करावयाचे होते मग नदीवर स्नान करायचें होतें. आणि अशा किती तरी गोष्टी पार पाडायच्या होत्या. ह्या सर्व रोजच्या आन्हिकामध्ये मास्तराच्रा कितीतरी वेळ गुतून पडे. बयो एकाद्या मुकादमा-प्रमाणे मास्तराच्यावर अशा वेळी देखरेख ठेवीत असे. भल्या पहाटें दिन-चर्येला आरभ करावा तेव्हा कुठें बाराची तोफ होण्यापूर्वी मास्तराना जेवण शक्य होत असे. पण आज मास्तर तुळशीच्या घरी गेल्यामुळें त्याचे सकाळचे बेत विस्कटल्यासारखे झाले. घरी गेल्यानतर बयो त्याच्यावर तणतणल्या-खेरीज राहिली नसती. पण मास्तराच्या मनात ह्याचे विचार पुसटपणे देखील उमटत नव्हते. बयोनें आठवण करून देईपर्यंत आपल्या हातून काही चुकले आहे, विसरले आहे याची त्याना जाणीव देखील झाली नसती. मास्तर आपल्या शाळेवरून जाऊ लागले शाळा सुटण्याची वेळ झाली होती. आणखी थोडा वेळ ते थाबले असते तर शाळेंतून शेवटच्या घटेबरोबर बाल-गोपाळाची गर्दी धावत धावत बाहेर पडताना त्याना दिसली असती घरी जाताना मुलाच्या उत्साहाला जे भरतें येई ते शाळेच्या कमानींत उभे राहून आवडीनें पाहाण्याचा मास्तराचा पूर्वीचा रिवाज होता पण तें आता सारें संपलें होतें. शाळेचा आणि त्याचा सबध कायमचा तुटला होता. त्याच्या बडतर्फीनंतर कुणा एका नव्या माणसाची त्याच्या जागीं नेमणूक झाली होती. नवे मास्तर आपल्या जागी रुजूं झाल्याचेहि त्याना कळलें होतें. नोकरी गेल्याचें मास्तराना फारसें दुःख कधीच वाटले नव्हते पण त्याच्या आवडत्या वर्गातील मुलें त्याना आता दुरावलीं होतीं. कधीं कधीं हीं मुले रस्त्या-वरून जाता येताना मास्तराना भेटत आणि मग मास्तरहि आपलें सारें कामधाम विसरून त्याच्याशी खूप काहींसें बोलत रहात. शाळेत असताना या अशाच खूपसे काहीं बोलण्यामुळें चित्रकलेचा तास हा बाजूलाच राही.

आणि मग मास्तर मुलाना कसल्या कसल्या गोष्टी मोठ्या रसाळपणें सागत असत. अशा वेळीं मुलांच्या मुद्रेवर ओसडून वाहणारे भाव पाहून मास्तर कैक वेळा तृप्त झाले होते. ती तृप्ती मास्तराना आता दुरावली होती, आणि नाटकाच्या खटपटींत मास्तर गुतून राहिले नसते, तर त्याना ती चांगलीच जाणवली असती यात शका नाहीं.

शाळेच्या इमारतीवरून जाताना मास्तराना या साऱ्या गोष्टींची आठवण झाली आणि मग ते मनात खिन्न होऊं लागले. इतक्यात त्याची नजर शाळेच्या प्रवेशद्वारापाशीं उभ्या असलेल्या दोन बालकाच्याकडे गेली. तीं दोन मुलें मुळुमुळु रडत असल्याचा त्याना भास झाला. त्याबरोबर मास्तर घाईनें तिकडे गेले. आणि त्या मुलाना कुरवाळत म्हणाले–

" रडायला काय झाल रे ? आणि इथें कां उभे तुम्ही ! ऊन लागत नाहीं का तुम्हाला ? "

मास्तराना पाहताच आईच्या कुशीत शिरावें तशी तीं दोन मुलें मास्तराना बिलगलीं, आणि उमसून रडूं लागलीं. काय झालें तें त्याना नीट सागतां देखील येईना. त्याच्या रडतखडत अडखळत बोलण्यावरून मास्त-राना इतकेंच समजलें कीं त्यांच्या जागी आलेल्या नव्या मास्तराच्या तासाला पोरानी गोष्ट सागण्याचा हट्ट धरला आणि नव्या मास्तरानीं त्याबद्दल त्यांना काही शिक्षा केली. मास्तरांचें लक्ष सहजगत्या समोरच्या आपल्या वर्गाकडे गेले. नवे मास्तर कोणावर तरी तारस्वरात आरडत ओरडत होते, अद्वातद्वा शिवीगाळ करत होते पोरानीं त्यावर हुल्लडबाजी करताच कोणाच्या तरी अगावर धावून जाऊन सतापाच्या भरात ते छडीनें त्यास फोडून काढूं लागले होते पाडू मास्तरानीं तें दृश्य पाहिलें मात्र – आणि क्षणार्धात त्याचें भान हरपलें. ते तसेंच पायऱ्या चढून आपल्या वर्गात शिरले. विजेच्या चापल्याने नव्या मास्तराच्या हातातील छडी त्यानीं हिसकावून घेतली आणि ते कडाडले–

" लहान पोराना तुम्ही काय म्हणून मारता ? कोण माणूस आहात कीं हैवान ! "

त्याबरोबर नवे मास्तर चपापून पाहूं लागले. प्रथम त्याना वाटलें कीं हेडमास्तरानीच ही गर्जना केली असावी, म्हणून अपराधी स्वरात ते घाई-

घाईनें काही खुलासा करणार होते. पण इतक्यात खुद्द हेडमास्तराचीच स्वारी वर्गामध्यें आली. हेडमास्तर पाडू मास्तराच्यावर खेकसले –

" त्याच्या आधीं तुम्हालाच मी प्रश्न विचारतों की लोचटासारखे तुम्हीं या शाळेंत पाऊल का टाकलें ? गड्याकडून धक्के मारून घालवायला हवं की मुकाट्यान बाहेरचा रस्ता सुधारणार आहात ? "

हे उद्गार ऐकून पाडू मास्तराचा सारा आवेश मावळला अपमानाचे जिव्हारीं घाव बसल्यासारखी त्याची मुद्रा झाली. न बोलता शरमिंदेपणानें मास्तरांनीं पाठ फिरविली, आणि ते जाण्यासाठीं वळले. हेड्मास्तराना चेव आला होता. अपशब्दाची खैरात करीत मास्तराच्या मानगुटीला हात घालण्यासाठीं ते पुढे झाले. तेवढ्यांत इतका वेळ हा सारा प्रकार चकित मनानें, भयभीत अंतःकरणानें आणि अंतर्यामी धुमसणाऱ्या संतापानें पाहत राहणारीं वर्गांतील मुले सहजगत्या जागेवरून उठलीं. त्यापैकीं काहीं पुढें धावलीं, आणि त्यानीं हेडमास्तराची वाट, परिणामाची पर्वा न करता, रोखून धरली. हेडमास्तर हा प्रकार पाहतांच चागले वरमले आणि दोन पावलें मार्गे सरले. पाडू मास्तरानी वळून दृष्टिक्षेप टाकतांच त्याना प्रकार उमजला. आपण क्षणभरहि येथें थांबलों तर पोराच्या हातून अविचार घडेल आणि त्यांना शिक्षा होईल याची जाणीव होऊन ते भांबावले आणि घाईघाईनें पायऱ्या उतरून ते दारातून बाहेर पडले. दारापाशीं मघाचीं तीं दोन मुलें आता भीतीनें थरथर कापत उभीं होतीं त्याच्याकडे लक्ष जाताच मास्तर कळवळले. काय करावें तें त्याना क्षणभर समजेना. शब्दांच्या अभावी आपल्या दृष्टिक्षेपानेच त्यानीं त्या मुलाना गोंजारलें मग त्यानीं आपल्या हातातील रुमाल सोडला आणि पारिजातकाचीं ती टवटवीत फुलें त्याच्या हातावर ठेवली. मग घाईघाईनें मागे न पाहता ते तेथून निघून गेले.

●

# १०

त्यानतर चार आठ दिवसात नाटककपनीची प्रारभिक योजना पार पडून मास्तराच्या कंपनीच्या नव्या नाटकाचा मुहूर्तही झाला. छोटूमियाच्या दिवाणखान्यांत नाटकाच्या तालमी देखील सुरू झाल्या. नाटक कपनीचें खटलें एखाद्या लग्नाच्या वऱ्हाडासारखें असतें. दोन्ही ठिकाणीं राबणारीं माणसें थोडी, चरणारी माणसें जास्त. दोन्हींची मदार मुख्य मालकावर. त्याला दुवा द्यायचा आणि स्वत.ची चगळ चालवयाची. यामुळें दोन्हीकडे कार्याचा गवगवा करणारीं आणि स्वतःच्या सरबराईत थोडा उणेपणा होताच भाडणतटा करणारीं मानापमानाची माणसेंच धन्याला फार जाचक होतात. मुहूर्ताचा नारळ फुटल्यापासून रोजच्या रोज असल्या कटकटींनीं मास्तराचें डोके शिणू लागलें त्यातल्या त्यात समाधानाची गोष्ट एवढीच होती कीं त्याच्या कपनीच्या खजीनदाराचे काम छोटू संभाळीत होता. त्यामुळें मास्तराना नाटक बसविण्याकडे अधिक लक्ष देणें शक्य झालें.

परंतु तालमी घेण्याला आरंभ झाल्यानतर कांही दिवसानीं मास्तराच्या लक्षात आले कीं तम्मणाचार्यांच्या इशारतीप्रमाणें आपला रोग आता बळावला आहे. एरवी तें त्याच्या ध्यानात आले नसते. पण अभिनय शिकविण्यासाठीं म्हणून पुस्तक हातात घेऊन ज्या वेळेला ते नटासमोर उभे राहत त्या

वेळीं शरीरातलीं गात्रें त्याना ऐनवेळीं दगा देऊं लागली. त्याच्या तोंडून ओघवते उद्गार सरळपणें बाहेर पडेनात. आणि पडलेच तर त्यातला आशय एखाद्या भस्मसात् झालेल्या घराप्रमाणें करपलेला आणि छिन्नविछिन्न झालेला असे त्याच्या पायाचें थरथरणें, हाताचे वेडेवाकडे चाळे होणें, त्याचे ओठ फुरफुरणें आणि डोळे लवणे अशावेळीं अगदीं अनावर होऊं लागलें. काम करणारे नट देखील मास्तरांच्या ह्या अवताराला पाहून हंसू लागले. एखाद्या नटाची बोलण्याची पद्धति मास्तराना रुचली नाही कीं सहजगत्या ते त्याला थाबवून स्वतः ते उद्गार काढून दाखविण्याचा प्रयत्न करीत. एखाद्या नटाचा भावाविष्कार जमला नाहीं की ते स्वत. आपल्या मुद्रेवर तो उमटून दाखविण्याचा प्रयत्न करीत. पण हें सारे प्रयत्न क्षणार्धांत मातीमोल होत असत बोलण्यासाठी मास्तरानीं तोंड उघडलें किंवा भावाविष्कारासाठीं मुद्रेंतील स्नायूंची खेचाखेच केली की मनातच्या मनात, एकाद्या यंत्रागारातील चाकावरील पट्टा घसरून खाली पडावा आणि नुसती चाकेंच गरगरत रहावीत तसा नुसता आशय गरगरत राहत असे. प्रसंग शृंगाराचा असो वा वीररसाचा असो, कारुण्याचा असो वा वात्सल्याचा असो, मास्तर अभिनय करूं लागले म्हणजे त्यातून फक्त हास्यरसाचा कल्लोळ निर्माण होई. सशयकल्लोळसारखें विनोदी नाटक त्यामुळे हास्यास्पद होऊं लागलें. आजबाजूचीं माणसें हंसू लागलीं म्हणजे मास्तर व्याकळून जात.त्याच्या मनाची तगमग होऊं लागे अशा वेळी मास्तराना काय होत आहे हें फक्त तुळशी चतुरपणें जाणत असे. त्याच्या मदतीला ती पुढें जात असे त्याच्या हातातलें पुस्तक स्वतःच्या हातात घेऊन ती अभिनयाबद्दल नटाना सूचना करूं लागे.

आणि मग पुढें हें नेहमींचें झालें. मास्तरानीं नटाचा अभिनय पाहून नाखूष व्हावें. तो त्यानीं स्वतः करून दाखविण्याचा प्रयत्न करावा. पण पख कापलेल्या पक्ष्यानें गगनात भरारी घेण्याच्या उमेदीनें उड्डाण करावें आणि क्षणार्धात मातीतच खुरडूं लागावें तसें मास्तराचें व्हावे. मग मनातला आशय शब्दाच्या लक्तरात गोळा करून त्यानी कसाबसा तुळशीच्या किंवा अन्य कोणा, त्यातल्या त्यात अनुभवी नटाच्या स्वाधीन करावा. मग दुसऱ्यानें

शिकविलेल्या अभिनयाची सावत्र मुलाप्रमाणे आबाळ व्हावी, आणि एखाद्या मुक्या माणसाच्या मनाचा कोंडमारा व्हावा, आणि तो जवळच्या माणसालाहि उलगडून दाखविता येऊं नये तशी मास्तराच्या मनाची अगतिक आणि असहाय्य स्थिति होऊं लागावी. यामुळे आठ पधरा दिवसात नाटक आपल्या मार्गानें बसत गेलें हें खरें. पण मास्तराचें मन त्यावरून उडाल्यासारखें झालें.

शिवाय ज्याचा मास्तरानी आधीं फारसा विचार केला नव्हता अशा अनेक अडचणी प्रत्येक दिवशी निर्माण होऊं लागल्या, आणि त्याना तोंड देता देता मास्तर अक्षरशः हैराण होऊं लागले. छोटूमिया रोज काही ना काही निमित्तानें त्याचेकडून पाच पचवीस रुपयाची उचल करू लागला. हे सारेच पैसे नाटकाच्या कामासाठी खर्च होत होते असें नव्हे. त्यात छोटू स्वतःचे हात भरपूर धुवून घेत होता. नाटकासाठी आवश्यक अशा खर्चाची यादी चोखदळपणे कोणींच तयार केली नव्हती. त्याचा परिणाम असा झाला कीं ज्यावेळी जें लागें त्यासाठी दुकानाकडे धाव घेण्यात येई आणि प्रत्येक वस्तू जवळ जवळ दामदुपटीनें खरीदण्यात येई. नाटकाच्या नावावर काही दिवस नटाची खाण्यापिण्याची चगळ चालविण्यात आली. नाटकाच्या नावें कित्येक नटानी अगाऊच काही पैशाची उचल केली होती. जाहीरातखात्यावर भरपूर पैसा ओतला जात होता त्यामुळे नाटकाची प्रसिद्धि गावभर धूमधडाक्यानें झाली होती यात शका नाही. पण प्रत्यक्ष नाटकाचे दिवस जसजसे जवळ आले तसतशी मास्तराची पुजी संपुष्टात येऊं लागली.

नाटकाला आठच दिवस अवकाश उरला असताना छोटूचें आणि मास्तराचें फार मोठें भाडण झालें, आणि छोटू प्रत्यक्ष नाटक रगभूमीवर येण्यापूर्वीच मास्तराच्या कपनीतून निघून गेला. भाडणाची बाबत अगदी साधी होती. छोटूच्या उधळपट्टीबद्दल काही असतुष्ट नटानीं मास्तराच्याजवळ चुगलखोरी केली होती. पण बारीकसारीक बाबतींत कोणीहि येऊन सागणाऱ्याच्या बोलण्यानें भारून जाण्याइतके मास्तर काही हलक्या कानाचे नव्हते. ज्या एका तात्पुरत्या नाट्यगृहात मास्तराचें नाटक लागणार होते त्या नाट्यगृहाच्या मालकाला पहिल्या प्रयोगाच्या भाड्यादाखल सुमारे शभर

रुपये, नटाचे कपडे आणि इतर सजावट यासाठीं सुमारें दीडशे रुपये, अशी जवळ जवळ अडीचशें रुपये रक्कम छोटूनें पूर्वी एकदा खर्ची घातल्याचें मास्तराना ठाऊक होते. प्रत्यक्ष करारमदार आणि कागदपत्र त्यानीं पाहिलें नव्हते, आणि एरवी पाहण्याची त्याना जरूरीहि पडली नसती; पण याच कामासाठीं छोटूनें पुन्हा एकदा पैशाची मागणी केली त्यावरून खरें-खोटेपणाविषयीं दोघात बाचाबाची झाली. पूर्वी या कामी पैसे उचलल्याचें छोटूने साफ नाकारलें. इतकेंच नव्हे तर अनेक रकमाचा तो हिशोबहि सादर करू शकला नाही त्यामुळें अखेर मोठी थोरली खोट बसून मास्तराना छोटूला निरोप द्यावा लागला. या सबध प्रकरणात छोटूने मास्तराना चागलेंच तोंडघशीं पाडलें होतें. पण बाचाबाची झाली त्यावेळी त्यानें असा काहीं तंटा केला की या निरपराधी माणसावर उगाच कुभाड रचण्यात येत आहे, असें इतराना वाटावें. मास्तर छोटूवर इतके विश्वासून राहिले याचा त्याना भारी पश्चाताप झाला. पण त्यात काही नवल नव्हतें. छोटूच्या ऐवजीं दुसरा कोणी असता तरी त्याच्यावरहि ते असेच विसंबले असते आणि मग पश्चात्तापानें असेच हळहळले असते. आपमतलबी दुनियेच्या झळा लागूनहि काहीं माणसें मनानें टवटवीत राहतात ना? त्यातलेच मास्तर होते. फसले जाण्याची ही काही त्याची पहिलीच वेळ नव्हती. बोलणारा माणूस थोड्या जिव्हाळ्यानें बोलूं लागताच एखाद्या बालकाप्रमाणें ते त्याच्या अंकित होऊन जात आणि प्रत्येक वेळीं त्याना सल्लामसलत देणाऱ्या त्यांच्या हितचिंतकानाहि ते बजावून सागत कीं पूर्वी भेटलेल्या माणसापेक्षा हा इसम काहीं निराळा आहे छोटूशीं त्याचे जे जे व्यवहार झाले त्याबद्दल त्याना बयोपासून तुळशी-पर्यंत अनेकानी धोक्याच्या इशारती दिल्या होत्या. पण जगात काही माणसें लुबाडण्यासाठींच जन्माला येतात हें काहीं खोटें नाही निरुपद्रवी कोकराचा कळप निर्धास्तपणे सृष्टीच्या कुशीत शिरून बागडत असतो म्हणूनच रक्ताला लालचावलेल्या कावेबाज लाडग्याचें फावत असतें.

छोटूमियाशीं झालेल्या तत्र्यानतर मास्तराना नाटकाच्या तालमी कोठें घ्याव्यात हा मोठा प्रश्न पडला तुळशीनें त्याना आपल्या बंगलीतला दिवाणखाना या कामीं वापरण्याची पूर्ण परवानगी दिली. पण काहीं

अनुभवी वृद्ध नट, मोठे धर्ममार्तंड आणि सोवळ्या नीतीचे कैवारी होते. त्यानीं एका क्षुद्र नायकीणीच्या घराची पायरी चढण्याचें साफ नाकारलें मग गावाच्या कडेला एक धर्मशाळा कोणी एका दयाळू श्रीमान् माणसानें बाधून ठेवली होती. या धर्मशाळेतील एक दिवाणखाना मास्तरानीं मोठ्या मिनतवारीनें अनेकाच्या हातापाया पडून मिळविला. आणि अशा रीतीनें नाटकाचें अडलेलें गाडें कसेबसें पुढें रखडूं लागलें

पण मग त्यानतर दुसरीच चिन्ता निर्माण झाली. तात्पुरत्या नाटकगृहाच्या भाडेखर्चाबद्दल छोटू कानावर हात ठेवून मोकळा झाला हें ठीक झाले. पण भाड्याची रक्कम अगोदर आदा केल्याखेरीज या नाटकगृहाचा मालक मास्तराचें कसलेंहि बोलणें ऐकून घ्यावयास तयार नव्हता. इतके दिवस हें नाटकगृह नुसतें पडून राहिलें होतें. पण वखार भागात चाललेल्या ताज्या घडामोडींचा परिणाम येथेंहि झाल्याशिवाय राहिला नाहीं. आसमतात गुऱ्हाळें लागलीं होतीं, आणि गुळाच्या भरमसाट ढेपा पैदा झाल्या होत्या. या गुळाच्या ढेपा ठेवण्यासाठीं गुदाम म्हणून या नाटकगृहाला व्यापारपेठेंतून मागणी आली होती. त्यामुळें मास्तरानी ज्या वेळी नाटकाच्या पहिल्या प्रयोगासाठीं हे नाटकगृह मागितलें त्यावेळीं मालकानें भरमसाट भाड्याची मागणी केली. मास्तर त्या दिवशी खिन्न मनानें आणि उदास मुद्रेने तालमीच्या ठिकाणी उपस्थित झाले नेहमीसारखे आज त्याचें कामातहि लक्ष लागले नाही तालीम आटोपल्यावर तुळशी त्याच्याकडे आली. तिने त्याची मनःस्थिति हेरली असावी.

ती मायेने म्हणाली—“ तुम्हाला बरे वाटत नाहीं का ? तुमची प्रकृति ठीक दिसत नाही. ”

“ प्रकृतीचे काय नेहमीचेंच आहे.” मास्तर खिन्नपणे हसून म्हणाले.

“ मग कसल्या काळजीत आहात तुम्ही ? आणखी कोणती नवी अडचण नाही ना निर्माण झाली ? ”

या प्रश्नाने मास्तराचे अंतःकरणच हलल्यासारखें झालें मग त्यानी जे जें म्हणून सागण्यासारखें होतें तें ते सारे सागून टाकलें एरवीं इतर कोणा नटापाशीं आपल्या जवळचे पैसे सपून गेल्याचें ते बोलले नसते. कारण

त्याचा परिणाम विपरीत झाला असता. पोटार्थी आणि पैशार्थी नट आपला ठरलेला वाटा पदरात पडल्याखेरीज नाटकासाठीं उभे राहिलेच नसते. कारण ते काहीं मास्तराच्या सारखें वेडे झालेले नव्हते. त्याच्यापैकी प्रत्येकाला कसला ना कसला तरी पोटापाण्याचा धंदा होता. आणि या धंद्यात बरींच वर्षे राबल्यानें त्याची दृष्टीही धंदेवाईक झाली होती.

तुळशीची गोष्ट निराळी होती. म्हणूनच मास्तर इतक्या प्राजळपणें तिच्या जवळ आपले मन उलगडून दाखवू शकलें होते. हे सारे बयोला कळतें तर तिनें त्याची अत्यंत कडक शब्दात खरड काढली असती. तिच्याशिवाय इतर कुणालाहि कळलें असते तरी प्रत्येकानें कुचेष्टेने हसून संभावितपणें " आम्हाला हें आधींच ठाउक होतें. या खुळ्याच्या हातून दुसरें काय होणार आहे ? " असें काहींसें म्हटलें असतें.

तुळशीनें मास्तराची सारी कहाणी ऐकली आणि नोकराणीबरोबर ती निघून गेली. मग मास्तराना बरेंचसे मोकळें वाटलें. निदान ह्या जगात एका व्यक्तीला तरी आपल्याबद्दल सहानुभूति वाटू शकते ह्या प्रत्ययानें त्याच्या मरगळलेल्या मनाला थोडासा हुरूप आला. मग या नव्या हुरूपानें ते आपल्या मनाशीं एकटेच बसून काहीं योजना ठरवू लागले. एव्हापावेतों धर्मशाळेंतील दिवाणखान्यातून उरले सुरले रेंगाळणारे नट निघून गेले होते. दिवाणखान्याला टाळा ठोकण्यासाठी धर्मशाळेचा मुनीम आला तेव्हा मास्तरहि घरीं जाण्यासाठीं उठले तोंच तुळशीची नोकराणी दिवाणखान्याच्या दरवाजातून आत आली. मास्तर विस्मयानें तिच्याकडे पाहू लागले. तोंच ती म्हणाली—

" बाईनी हें पाकीट आपल्याला दिलें आहे "

मास्तरानी पाकीट फोडलें तो आत सुमारें दोनशे रुपयाच्या नोटा ठेवलेल्या होत्या दुसऱ्या कसल्याहि मजकुराचे पत्र वा चिठ्ठी देखील नव्हती. मास्तर कितीतरी वेळ गहिंवरल्या मनानें त्या पाकिटकडे विचारमग्न होऊन पाहत होते मग भानावर येऊन काही विचारण्यासाठीं त्यानीं मान वर कला तो नोकराणी केव्हाच निघून गेली होती.

• • •

# ११

अखेर बराच गाजावाजा झाल्यानंतर मास्तराच्या कंपनीचें मशयकल्लोळ नाटक रंगभूमीवर झळकण्याची रात्र उजाडली. या नाटकाची प्रसिद्धीपटूंनीं केलेल्या जाहिरातीपेक्षा, त्याच्या मार्गांत आलेले अडथळे आणि त्याच्या पायीं झालेले भांडणतंटे यामुळेच या नाटकाचा गावांत बराच गवगवा झाला होता त्यामुळें या नाटकाची काय विल्हेवाट लागते ते पाहण्यास गावातली बरीच माणसे उत्सुक झालीं होती त्यापैकी काहींची दृष्टि कुचेष्टेची होती, तर काहीची उदासीनतेची होती. गावांत कुठलेंहि नाटक वा सर्कस येताच देव-दर्शनाप्रमाणे बिनचूक अशा प्रयोगांना हजर राहणारीं माणसे होतीं, तशीच चव्हाट्यावर शिमगा साजरा करायला मिळावा या वृत्तीनें नाटक पहाण्या-साठीं टपलेलीं विघ्नसंतोषी माणसेंहि होती. गावकऱ्यांच्यांत इतकी उत्सुकता निर्माण होऊनहि नाटकाचीं तिकिटें मात्र काही फारशी खपलीं नाहीत. तीन दिवस आधीं नाटकगृहात नकाशा खुला करून चार दोन माणसें दिवसभर तिष्ठत बसलीं होतीं. पण प्रत्यक्ष तिकीट विकत घेण्यापेक्षा नाटकाची, नटाचीं आणि विशेषतः नटीची आस्थेवाईकपणें चौकशी करून जाणारी मंडळी बरीचशी होती. त्यातले कित्येक सद्गृहस्थ, " नाटक असें हवें होते आणि तसें हवे होते, अमकाच नट कशाला घेतला ? या

नटीत विशेषसा काहीं दम नाहीं." असा पोक्त सल्लाहि तिकिट विकणाऱ्या कारकुनाला देत असत. गावातल्या झाडून साऱ्या अधिकाऱ्यानीं—यात टोलनाक्यावरच्या जकातवाल्यापासून मामलेदारसाहेबाच्या पर्यंत साऱ्या अधिकाऱ्याचा समावेश होता—आपल्या जन्मसिद्ध हक्कानें फुकट पास स्मरणपूर्वक मागून नेले होते. अधिकाऱ्याच्या पावलावर पाऊल टाकून त्याची आश्रित मडळी आणि नोकरचाकर यानीं सहकुटुब सहपरिवार माडवशोभा करण्याचे आमत्रण लावून ठेवले होतें मास्तराच्या सौजन्यामुळें आणि इतरेजनाच्या निर्लज्जपणामुळें त्या दिवशी गावात फुकट पासाचा सुकाळ झाला होता. त्यामुळें तिकीट विक्रीचा नकाशा जरी जवळ जवळ रिकामा होता, तरी प्रत्यक्ष नाटकाच्या आधीं फुकटया प्रेक्षकाची नाटक-गृहावर झुंबड उडाली होती. जमलेल्या मडळींत जागेवरून व्यवस्थापकांशीं तणतणणारे आणि त्याना दमदाटी करणारे काही महाभागही निघाले.

मास्तर स्वतः रगपटात पात्रे रंगविण्यात, रगभूमीच्या सजावटीवर अखेरचा हात फिरविण्यात आणि एकदरीनें आतलें सारें सूत्र साभाळण्यात गळ्या-पर्यंत बुडले होते. नाटकाला फारशी प्राप्ती झाली नाहीं या दुःखापेक्षा बरीच मडळी नाटकाला आवर्जून उपस्थित राहिली आहेत या कल्पनेनें ते खूष झाले होते. नाटकाला आरभ होण्याला सुमारें पाऊण तासाचा अवधि राहिला असताना मास्तरानीं रंगभूमीची पूजा आरभिली.

बाहेर प्रवेशद्वाराशी टेबलावरचा नकाशा मांडून बसलेला कारकून, माणसाच्या झुडीच्या झुडी त्याच्याकडे ढुंकूनही न पाहता आत शिरताना पाहून मनातल्या मनात चरफडत होता. इतक्यात एक मिशाळ गृहस्थ त्याच्यापाशीं आले आणि पाढू मास्तरांची चौकशी करूं लागले. कारकून विडीचा झुरका घेत त्याना म्हणाला—

"का? तुमचा लग्गा लागला नाहीं वाटत? भटजीबुवा, गावाला आमत्रण दिल्यासारखे सोंवळें, भाडें घेऊन पळापळ करायला, हें काय अन्न-छत्र आहे असें समजलात? मुकाट्यानं तिकिट घ्या विकत! जो येतो तो खुशाल आत घुसतो आहे! सकाळीं जाहिराती वाटल्या कीं चुकून तिकिटच वाटलीं कुणास ठाऊक?"

" काय, काय म्हणता काय तुम्ही ? ही— ही सगळी गर्दी फुकट्या प्रेक्षकाची आहे ? "

" मग, खोट सागतों आहे कीं काय ? हे फ्लॅन्स बघा आणि हा गल्ला बघा, "

त्याबरोबर ते मिशाळ गृहस्थ नाटकगृहाच्या दाराशीं जाऊन आतला अदमास घेऊन परत आले. आणि म्हणाले—

" ही गर्दी पाहून मी समजत होतों कीं आमच्या पाडोबानीं जिंकली बुवा पण कायहो, या पुढच्या चारदोन रांगेंत चागले गलेलठ्ठ, छानछोकीच्या पोषाखातले लड्डू बसलेले दिसतात; ह्यानीं फुकट कां यावें ? "

हे उद्‌गार ऐकून कारकुनाची तारांबळ तडाली. आणि घाबऱ्या घाबऱ्या तो म्हणाला—

" अहो मेहरबान, जरा हळूं बोला. सरकारी अधिकारी आहेत ते ! त्याच्या कानीं एक शब्द गेला तर तुम्हाला आणि मला रात्रभर पोलीस कोठडीची हवा खावी लागेल. "

" काय बिशाद आहे ! म्हणे पोलीस कोठडींत घालतील मला ! सरकारी अधिकारी झाले म्हणून काय झालें ? आता काय पूर्वी सारखी मोगलाई उरली आहे ? कोर्ट-कचेरीच्या बाबतीत या अधिकाऱ्यानी आम्हाला काय सांगावें ? या मामाची उभी हयात कोर्टांचे उंबरठे झिजविण्यात गेली आहे, समजलात ? "

" मामा ? कोण मामा ? कुठले मामा ? "

" या पाडोबाच्या बायकोचा मामा आहे मी. जावईबापूनें काय गुण उधळले आहेत तें बघायला मी आलों आहे. आणि काय हो, सरकारी अधिकाऱ्यानीं नाटक, सिनेमा, सर्कशीचे फुकट पास स्विकारता कामा नये, हा कलेक्टरसाहेबाचा ४३ नंबरचा फतवा ह्याच्यापर्यंत अजून पोहोंचला नाही वाटतं ? "

समोर शिरा ताणून बोलणारा इसम श्राद्धपक्षाचा भटजी नसून, मास्तराचा कुणी जवळचा नातेवाईक आहे असें समजताच कारकुनानें विडी विझविली आणि तो खुर्चीतल्या खुर्चीत सावरून बसला. मग मामानीं त्याला खोदखोदून सारी बातमी विचारली, आणि नाईलाजाने त्यालाहि तपशीलवार साऱ्या घडामोडींचा खुलासा करावा लागला.

मग मामासाहेब विचारमग्न झाले आणि गर्दीचा रागरंग पाहत तेथल्या तेथें येरझारा घालूं लागले. पुनःपुन्हा प्रत्येक दारातून आत डोकावून ऐसपैस बसलेल्या प्रेक्षकाची सुरत ते न्याहाळूं लागले. तोच काहीं एक कल्पना त्याच्या मनात चमकली. स्वतःशींच किंचित् हंसत ते पुटपुटले—

"......असेच ! गुलामाची चागली खोड मोडतों ! ......"

मग ते लगबगीने पुन्हा त्या कारकूनाजवळ आले आणि त्याच्या कानाशीं लागून काही कुजबुजले. त्याबरोबर तो विस्मयानें कावरा बावरा होऊन एकदम म्हणाला—"अहो, पण......"

"पण नाहीं अन् बिण नाही. मीं सागतो असच झाल पाहिजे. तुम्ही माझ्या बरोबर नुसते चला. मी काय बोलेन त्याला मान डोलवा म्हणजे झाल."

मग कारकून नाइलाजानें उठला.त्यानें हातातल्या किल्ल्या आणि टेबलावरील नकाशा दुसऱ्या एका इसमाच्या ताब्यात दिला, आणि मामासाहेब ज्या घाईनें पहिल्या दारापाशीं गेले तशाच लगबगीने तो त्याच्यापाठीमागें धावला.

मामासाहेब दाराशी एखाद्या अधिकाऱ्याच्या थाटात उभे राहिले आणि खाकरून खोकरून पहिल्या चार दोन रागात बसलेल्या माणसाचें आपल्याकडे लक्ष जाईल अशा बेताने ओरडून ते म्हणाले—

"ह्याच त्या चारपाच ओळींतली माणसें ना ? ठीक ! घ्या दरवाजे लावून. आणि मागच्या बाजूलाहि चार दोन माणसे नीट हुशारीनें तयार ठेवा. काहीं लुच्चे लोक पळून जाण्याचा देखील प्रयत्न करतील. हे पहा, हा कलेक्टरसाहेबाचा हुकूम आहे. भारी तापट माणूस आहे हो ! परवा आपल्या त्या ह्या ठिकाणीं एकेकाला बदुकीच्या गोळ्या घालून ठार मारायला निघाला होता. पन्नास पन्नास रुपयाच्या दडावर भागलें म्हणून नशीब त्याचें ! ......लाचलुपत आणि फुकटेपणा याचा मनस्वी तिटकारा आहे त्याला. आताच पहा ना ! मी आपलं सहज बोलून गेलों— "

"म्हणजे कलेक्टरसाहेबाचा मुक्काम आज इथ आहे ?"

"मग सागतो काय ? त्यानाच तर भेटून आलो ना मी आता. अहो हा कलेक्टर म्हणजे आमच्या त्या बगीचा भाचा ! गावातल्या सरकारी

अधिकाऱ्यानी फुकट-पास नेले आहेत असें मी सहज सागताच तो काय खवळला, काय संतापला ! घरात फेकाफेक काय केली ! उगीच आहे काय ? कलेक्टरचा राग तो ! एकेकाला सहा सहा महिने सस्पेंड करून टाकतो असें म्हणाला. मी नको म्हटलें, पण आमचें कोण ऐकतो. स्वतः जातीनें येऊन तिकीटें तपासतो असे तो म्हणाला— ''

एवढा बार भरून मामासाहेब पुन्हा बाहेर आले आणि प्रवेशद्वारापाशीं उभे राहून कुणातरी बड्या माणसाची वाट पाहत असल्याचा त्यानी आविर्भाव केला. आजूबाजूला रेंगाळणाऱ्या माणसाना उगाच, 'वाटेंत गर्दी करू नका, कलेक्टर साहेब येताहेत,' असें सागण्यासहि ते चुकले नाहींत. मामासाहेबानीं केलेल्या अभिनयाचा ताबडतोब परिणाम दिसून आला. दाराजवळ बसलेल्या प्रेक्षकाना पलिकडच्या मडळींनी "काय झालें, काय झाले," म्हणून पृच्छा केली. आणि त्यानीहि मामासाहेबाचें बोलणे तिखट मीठ लावून पुढें पोचतें केले आणि मग हा हा म्हणता ही तिखट मीठ लावलेली वार्ता अधिकाऱ्याच्या गोटात पसरली. त्याबरोबर या मडळींची धावपळ उडाली. जो तो आपले खिसे चाचपीत प्रवेशद्वाराशी उभ्या असलेल्या माणसाबरोबर सलगीनें बोलून बाहेर पडू लागला. बघता बघता कारकुनाच्या टेबलाजवळ या प्रेक्षकाची झुबड उडाली. आणि नकाशावरील जागा भराभर भरल्या जाऊ लागल्या

थोड्या वेळानें नाटक सुरू झाले तरी कलेक्टर साहेब काही आले नाहीत. मामासाहेबानीं गल्ला आपल्या ताब्यात घेतला. चार दोन जिज्ञासू माणसाना त्यानी सागितलें "तसें काही कलेक्टरसाहेबाचें येणें नक्की नव्हतें. वेळ झाला तर येतो, असें ते म्हणाले होते. अहो जिल्ह्याच्या गावाहून आधी सुटका व्हायला हवी ना ? ... "

आणि मग गल्ला घेऊन मामासाहेब अतर्धान पावले. इतकें झालें तरी त्या रात्री नाटकाला काही रंग चढला नाही. रगदेवता जणू रुसल्यासारखी झाली होती. तुळशीचें काम सोडलें तर बाकीच्या नटाचीं कामें अगदीं गचाळ झाली. पाडू मास्तराच्या दिग्दर्शनाचा कोठें स्पर्शहि दिसेना. त्यामुळे नाटक पाहणारे प्रेक्षक पहिल्या एक दोन अकातच कटाळले त्यापैकीं काहीं

मध्येंच उठून गेले आणि उरलेले जांभया देत आणि पेंगत अखेरपर्यंत पैसे वसूल करण्यासाठी तग धरून होते. नाटक संपल्यानंतर घरोघर जाणाऱ्या माणसांत नाटक सपशेल पडल्याचा गवगवा झाला. हिरमुसल्या मुखानें तोंडावरचा रंग उतरवून नट आपापल्या घरी गेले मास्तर मात्र कितीतरी वेळ पिचलेल्या मनस्थितींत एकटेच रंगपटात बसून राहिले होते. त्याचा उत्साह करपला होता. त्याची उमेद ठायीं ठायीं ठेचली गेली होती. आणि त्याचा नाट्यलोलुप आत्मा दग्धपक्ष गरूडाप्रमाणें मातीत खुरडूं लागला होता.

●●●

# १२

जाईला बरे नव्हते म्हणून बयो त्या रात्री नाटकाला आली नव्हती पण नाटकाचा उडालेला बोजवारा तिला मामासाहेबाच्याकडून सविस्तर कळला होता गल्ला घेऊन मामासाहेब घरी आले आणि पैसे मोजून त्यानी ते बयोच्या ताब्यात दिले. देताना यापुढे तरी पैशाचा व्यवहार नीट जपून करण्याचा त्यांनी तिला उपदेश केला. जावईबापूचा अनागोंदी कारभार आणि अव्यवहारीपणा यावर ताशेरे उडविण्यास ते चुकले नाहीत. आणि या साऱ्याचें मूळ बयोने मास्तराच्या हातीं पैसे दिले, येथें असल्यानें तिची देखील सडकून हजेरी घेण्यास मामासाहेब कचरले नाहींत. बयोच्या मांडीवर तापानें फणफणलेली जाई निजली होती म्हणूनच नव्हे तर एरवी देखील मामाचे हे असले बोलणे तिला निमूटपणें ऐकून घेणें भाग होतें. मामाच्या रागाचा पारा बराच वर चढला होता. त्यामुळें घरातल्या घरात पाठीवर हात घेऊन शतपावली करत ते बडबडत सुटले होते

मास्तर ज्या वेळी घरी आले त्यावेळीं मामाच्या चढलेल्या आवाजातील काही शब्द ऐकून ते क्षणभर जिन्यातच थबकले मामा बयोला म्हणत होते—

..." नवरा झाला म्हणून काय झाल ? असला मूर्खपणा माणसें किती दिवस सहन करणार ? आज दहा वर्षे पाहतो आहे मी, तुझ्या

अंगावर एक धड चिरगूट नाही की गळ्यात फुटका मणी नाही; खायला पोटभर भाकर नाही की निवाऱ्याला धड जागा नाही. हें काय घर झालं ? ही काय संसार करण्याची पद्धत झाली ? ..." शतपावली करताना मध्येंच थांबून मामा संतापाने म्हणाले– " ... छे, छे ! बायडे, हा संसार बस् झाला ! उद्याच्या उद्या तूं माझ्याबरोबर चल. घालूंदे याना काय गोंधळ घालायचा तो."

एरवी कडक लक्ष्मीसारखी गर्जना करणारी बयो विलक्षण शांतपणें त्यावर उत्तरली—

"मामा, घर सोडून जाण्याच्या गोष्टी तुम्हीं मला सांगतां ? घर सोडायचं असतं तर यापूर्वी असे प्रसंग कमी का आले होते ? यानीं कसला छंदीफंदीपणा केला असता तर खरेंच मी घर सोडलेंहि असतें. पण एका नाटकाच्या वेडाखेरीज याना काहीं म्हटल्या काही व्यसन नाही मी जर उद्या तुमच्याबरोबर निघून गेले तर हे अगदी उघडे पडतील. लोक याना भिकेला लावतील"

हे उद्गार मास्तरांच्या अंतःकरणाला कापीत गेले मग ते वर आपल्या घरात आले. त्याना पाहताच मामासाहेब गप्प झाले आपला घुस्सा मास्तराना दिसावा म्हणून मुद्दामच त्यांच्याशीं भाषणहि न करता मामा आथरुणावर जाऊन लवंडले त्यानीं डोक्यावरून पांघरुण ओढून घेतलें. मग कपडे काढून मास्तरहि आथरुणावर लवंडले. पण कितीतरी वेळ ते एका कुशीवरून दुसऱ्या कुशीवर तडफडत होते. पहाटेची गार वाऱ्याची झुळूक आली तेव्हां कोठे त्यांचा डोळा लागला

उन्हे बरींच वर आल्यावर सकाळी मास्तर जागे झाले ते कसल्यातरी गलबल्यानें. दाराशीं मामासाहेब कोणाशीं तरी तणतणत होते. कोणीतरी त्यांच्याशीं हुज्जत घालत होते. हुज्जत घालणारे चार पांच आवाज मास्तराना ओळखीचे वाटले. मास्तर ताडकन् उठले, आणि बाहेर आले. मास्तरांच्या नाटकांत काम करणारे नट जिन्याच्या तोंडाशीं उभे होते आणि मामासाहेब त्याना हातावर मूठ आपटून मोठ्या तोऱ्यात म्हणत होते—

"एक छदाम मिळणार नाहीं ! आजपर्यंत जी पैशाची उचल केलीत ती

परत मागत नाहीं, हें तुमच नशीब समजा. मारे ऐटींत कराराच्या गोष्टी तुम्ही मला सागता ? चार ओळी तरी कुठे लिहिलेल्या आहेत का ? आणि काय हो चिंतोपत, जन्म गेला सगळा तुमचा खानावळींत वरण-भात वाढण्यात. अेका रात्रींत कधीं इतके पैसे मिळण्याची आशा धरली होती का तुम्ही ? का माती मऊ लागली म्हणून कोपरानें खणावयाचा प्रयत्न करता ?"

तेवढ्यात मास्तर पुढे झाले आणि म्हणाले—

" मामासाहेब तुम्ही नका तसदी घेऊ मी सागतो त्याना काय सागायचे तें. " मग मास्तरानीं आलेल्या लोकाना आपुलकीनें आत बोलाविले. त्याच्यासाठीं घोंगडी झटकून टाकली, आणि त्याना त्यावर आतिथ्यशीलतेनें बसविले मामा मग घुश्श्यातच भिंतीजवळ उकिडवे बसले. आणि कानावर ठेवलेली विडी काढून शिलगावू लागले पाठू मास्तर आत गेले आणि बयोला म्हणाले—

" मामानी आणलेला कालचा गल्ला कुठे आहे ? "

बयो म्हणाली— " का ? कशाला हवे आहेत आता ते पैसे ! झाली एवढी उधळपट्टी पुरे नाहीं का झाली ? "

" ते पैसे आपले नाहीत, लोकाचे आहेत ज्याचे त्याला देऊन टाकले म्हणजे सुटलो. "

बयो रागारागानें फडताळापाशी गेली आणि पैशाची थैली काढून आणून मास्तराच्या समोर आदळीत म्हणाली—

" घ्या एकदाचे ! घरात आलेल्या लक्ष्मीला लाथ मारून बाहेर पिटाळायला निघालात तुम्ही ! "

मास्तर खिन्नपणें हसून म्हणाले—

" अग अशी उगीच रागावतेस का ? तुझा माझा जन्म गेला दारिद्र्यात दिवस उगळण्यात. दोन दिवसाचे हे पाहुणें वैभव आपल्याला मानवायचें नाहीं ! "

बयो त्यावर फणकाऱ्यानें आदळ आपट करीत कामाला लागली. मास्तरानीं थैलींतले पैसे मोजून पाहिले. प्रत्येक नटाच्या कामाचा किती वाटा आपण देऊ शकूं त्याचा मनाशीं हिशोब केला आणि मग बाहेर येऊन

तेवढी रक्कम प्रत्येकाच्या हातावर ठेवीत म्हटलें—

" क्षमा करा मला. ठरल्याप्रमाणें मी शब्द पुरा करू शकत नाहीं. फूल नाहीं फुलाची पाकळी म्हणून ही रक्कम आपण घ्यावी. कधीं काळीं रंगभूमीचा वनवास सपला आणि तुमचें माझे भाग्य उजळलें तर भरल्या हातानें तुम्हाला घरी पाठवीन."

आलेल्या नटानीं भराभरा रकमा खिशात कोंबल्या. थोडीशी कुरकुर करण्याचा त्याचा मानस होता, पण समोर मामासाहेब डोळे वटारून हा प्रकार पाहत आहेत हें पाहून त्याचा विचार तेथेच थिजला. शरमिंदेपणाने मामासाहेबाकडे पाहत ते उठूं लागले तेव्हा मामासाहेब खेकसले—

" बघताय काय लेको ? जा, पळा तुमचच राज्य आहे आता येथें. का आणखी काहीं राहिल आहे ? बघा, बघा ! शोधा, तुमचे करारनामे आमचे धर्मराज आणि कर्णराज तुम्ही मागाल ते द्यायला तयार आहेत. या कलियुगात असला हरिश्चंद्र पैसे खर्चून पहायला मिळायचा नाहीं तुम्हाला "

मामासाहेबाच्या अंगाचा अगदीं सताप झाला होता. तें असे बराच वेळ बडबडत राहिले. बोलल्याखेरीज त्याना राहवेना. आलेल्या मंडळीनीं भोरणीपणानें दात विचकून नमस्कार करीत तथून काढता पाय घेतला.

त्यानतर सबध दिवसात अशी कितीतरी माणसें आली आणि थोडे थोडे पैसे घेऊन गेलीं. आलेल्या प्रत्येक माणसाचा मामानीं खरपूस शद्बात समाचार घ्यावा आणि मास्तरानीं मध्यें पडून त्या इसमाला थोडे बहुत पैसे देऊन वाटेला लावावे. आणि मग मामांचा क्रोध अगदी अनावर होऊन त्यानी घरादाराला शिवीगाळ करीत सुटावें—असे बरेच वेळा घडलें होता होता जवळची सारी पुजी सपून गेली काहीं आणेल्या, पावल्या फक्त शिल्लक उरल्या बहुतेक साऱ्या देणेदाराची पायधूळ एव्हा पावेतो मास्तराच्या घरात झडली होती. फक्त अेकच व्यक्ति अद्यापपर्यंत मास्तराच्या घराकडे फिरकली नव्हती. ती म्हणजे तुळशी नाटक पडल्याचें दुःख मास्तराच्यापेक्षा कुणाला अधिक जाणवलें असेल तर ते तिला नाटक आटोपल्यानंतर हिरमुसल्या मनाने मास्तराचा निरोपही न घेता ती घरीं निघून गेली होती आता पैसे मागण्यासाठीं ती मास्तराच्याकडे आली

असती तरी त्याचा काहीं एक उपयोग नव्हता. मास्तराच्याजवळ फक्त लाचारीचे शब्द शिल्लक उरले होते.

दिवेलागणीच्या सुमाराला मातराच्या घरीं तुळशीकडून नोकराणी आली. तिला पाहताच मास्तर अजीजीनें काहीं लाचार शब्दाचा निरोप तिच्या-जवळ देऊं लागले. पण तिनें तो पुरता ऐकूनहि घेतला नाहीं, कारण पैशाची मागणी करण्यासाठीं ती मुळीं आलीच नव्हती. तिच्या मालकिणीनें फक्त एक लहानसा निरोप तिच्याबरोबर धाडला होता. तो पोचविण्या-साठीं ती आली होती. नाटकाच्या व्यवहारात मास्तराना बसलेली खोट ही त्याची एकट्याची आहे असें त्यानीं मनूा नये, त्याची जिम्मेदारी आपणहि घेतली आहे, म्हणून मास्तरानीं तिने दिलेले पैसे परत देण्याचा विचारहि आणूं नये, असा तो निरोप होता अवढा निरोप सागून अनत सुहृद्-भावाचें ओझें मास्तराच्या शिरावर ठेवून नोकराणी निघून गेली

मास्तराची मुद्रा एकाएकी अत्यंत करुण झाली. पण हा सारा प्रकार पाहून मामाचा राग अगदीं शिगेला पोंहोंचला. संतापानें थयथयाट करीत ते म्हणाले—

" झाले ? सपलें ? आता तरी समाधान झालें ना तुमचें ? छान, छान केलेत ! गावातल्या टोळभैरवाच्यावर पैशाची खैरात केलीत आणि त्या दिड दमडीच्या नायकीणीचें—"

" मामा— " मास्तर क्रोधाने ओरडले.

" भितो आहे काय खरें बोलायला ? ससाराचे वाटोळें करण्याचा तुम्ही दोघेहि चंगच बाधून बसला आहात. तुम्ही एक गाढव तर ही बायडी सात गाढव ! पैसा मिळवायची अक्कल नाहीं, कुणी मिळवून दिला तर तो टिकविण्याचे शहाणपण नाही ! धरा आता जन्मभर हातात भिकेची झोळी आणि खा माती... " असे म्हणत मामासाहेबानीं अगावर कपडे चढाविलें आणि हातात पडशी घेत बयो नको नको म्हणत असता ते पायात जोडा सरकावून बाहेर पडू लागले. बाहेर पडता पडता ते म्हणाले—

" आता टाचा घासून तुम्ही उपाशी मेलात तरी मी तुमचें तोंड पाह-णार नाहीं ! "

असे म्हणून जिन्यावरून धाड्धाड् पाऊलें आपटीत मामा खालीं आले शेवटच्या पायरीपाशीं येताच जाईच्या रडण्याचा आवाज त्यानीं ऐकला आणि ते थबकले. सहजगत्या ते पुन्हा माघारीं वळले वर येऊन दारातून डोकावीत त्यानीं विचारलें—

" पोरीच्या अगात ताप आहे का ग ? "

बयो मान हलवून नाही म्हणाली. मग मामा क्षणभर भांबावल्यासारखे झाले. खिसे चाचपत हुकमी आवाजात ते बयोला म्हणाले—

" पोरीला घेऊन तूं इकडे ये "

बयो जाईला उचलून घेऊन दारापाशी आली. पायातले जोडे काढून मामा आत आले आणि म्हणाले—

" ठेव माझ्या पायावर तिचें आणि तुझें डोकें "

बयोनें तसें करताच मामानीं आपल्या पुरचुंडींतून दोन दहाच्या नोटा काढल्या आणि एक जाईच्या हातांत आणि दुसरी बयोच्या हातात कोंबली, आणि पुन्हा पायात जोडा सरकावीत ते म्हणाले—

" हें पहा, काहीं कमी जास्त घडलें तर पत्र टाकून मला बोलावून घ्या. नाहींतर पुन्हा मस्तींत वागाल ! हा एक मानी, तर तू सात अभिमानी ! एखाद्या बादशहाच्या कुळातच तुम्ही जन्माला यायचे, ते चुकून या घरात पडलात ! " असें म्हणून बयो काहीं बोलण्यापूर्वीच ते ताड्ताड् जिना उतरून चालते झाले

● ● ●

# १३

निकाली कुस्तीमध्ये चारी मुडे चीत झालेला पहिलवान ज्या मरगळलेल्या वृत्तीनें आखाड्यातून घराकडे रखडत जातो त्या वृत्तीनें मास्तर त्यानंतर आपली दिनचर्या रखडूं लागले. पण दोन दिवसात बयोची लहान सहान पदार्थांसाठीं शेजारीं पाजारीं चाललेली उसनवारी पाहून मास्तराच्या लक्षांत आले कीं आता स्वस्थ बसून घरचा प्रपच निभणे कठीण आहे. पुन्हा नोकरी ही केलीच पाहिजे, आणि मग त्याना रावसाहेबाची आठवण झाली. रावसाहेबाच्या घरीं जाऊन त्याच्यापुढे लाचारीनें पदर पसरल्याशिवाय मास्तराना गत्यतर नव्हतें दोन दिवसाची त्याची मालकी फजित झाली होती. पण तिनें एक नवा अहकार मात्र मास्तराच्या मनात निर्माण केला होता. त्यामुळेच मास्तर रावसाहेबाच्याकडे जाऊन लाचारी पत्करण्यासाठी सहजासहजी तयार होईनात. पण तयार न होऊन सागतात कुणाला? मास्तराच्या हातात पैसा होता त्यावेळीं पैशाची किंमत त्याना कधीं समजली नाहीं. आणि आता पैसे नव्हते तेव्हाहि त्याची विशेष मातब्बरी वाटू लागली होती असेंहि नव्हे. पण व्यवहाराच्या कढत झळा अगावर येऊ लागल्या तेव्हा मास्तर पुन्हा एकदा अगतिक झाले. अशावेळीं बेचाळीस पिढ्याचा उद्धार करून का होईना पण पावण्याची खात्री असलेल्या देवाला म्हणजे

रावसाहेबाना शरण जाण्याचें त्यानीं ठरविलें.

एका सकाळीं मास्तर रावसाहेबाच्या घरी आले समोरच्या अगणातच थाटलेल्या छोटेखानीं बागेंत रावसाहेब जातीनें हातात खुरपें घेऊन काम करीत होते. कमिटीचे बीं-बियाणें आणि खत रावसाहेबाच्या बंगल्यावर येऊन पडले होतें. त्याचा रावसाहेब सढळ हाताने वापर करण्यात मग्न झाले होते. त्यामुळेंच फाटक उघडून मास्तर आत आल्याचे रावसाहेबाच्या लक्षात आलें नसावें. मास्तराच्या पावलाचा वाळूच्या पायरस्त्यावर आवाज होताच रावसाहेबानीं वळून पाहिलें आणि मास्तर दृष्टीला पडताच मोठ्या खुषींत पण कुत्सितपणें ते म्हणाले—

"यावें, यावें मालक! फारा दिवसानीं पायधूळ झाडली आमच्या घरात......"

आणि मग ते असेंच कितीतरी वेळ उपरोधानें वर्मी घाव घालू लागले. मास्तर खालीं मान घालून स्वस्थ उभे होते. ते एक चकार शब्दहि बोलले नाहींत. बोलण्यासारखें काहीं नव्हतेंच लज्जा आणि मान या वृत्ती श्रीमताना शोभून दिसतात. पदर पसरणाऱ्या माणसाना असला षोक परवडण्यासारखा नाही म्हणूनच मास्तर केलेल्या अपराधाचे प्रायश्चित्त भोगण्यासाठीं मिटलेल्या ओठानीं रावसाहेबाच्या समोर उभे होते. रावसाहेबानीं उपरोधाचे आणि कुचेष्टेचे मास्तराच्यावर यथेच्छ प्रहार करून घेतले. असे प्रहार करताना त्याना भरपूर करमणूक होत होती मग उपरोधाचे पर्यवसान क्रोधात झालें आणि मास्तराच्या प्रत्येक कृत्याबद्दल त्यानी त्याची सडकून हजेरी घेतली. पण हें सगळें करीत असताना, मास्तरानी सागितलें नाही तरी, ते पुन्हा आपल्याकडे नोकरी मागण्यासाठीं आले आहेत हें मात्र त्यानीं हेरले होते. म्हणूनच रागारागाने अखेर ते म्हणाले—

"नोकरी होती त्यावेळी मोठ्या मस्तीत वागलात आता फटके बसले तेव्हा आलात ताळ्यावर! रावसाहेबानी काय नोकऱ्याचें गुऱ्हाळ घातलें आहे काय रे?"

मग काही वेळाने ते पुन्हा मास्तराना म्हणाले—

"आता माझ्यासमोर तासन् तास तिष्ठत उभे राहून कांहींहि उपयोग

होणार नाहीं. शाळेंत काहीं तुला पुन्हा नेमता येणार नाही. आमच्या नावानं बोर्डाच्या सभासदानीं तुझ्या बाबतींत जेवढा शंख केला तेवढा पुरे झाला. "

तरी देखील पाडू मास्तर त्याच्यासमोरून हलले नाहींत. मग रावसाहेब पुन्हा एकदा मास्तराना म्हणाले–" हें पहा, एक तात्पुरती नोकरी आहे माझ्याजवळ, ती तर सध्या घे! मग पाहू पुढें काय करायचे ते. आता इथ नाटयमहोत्सव व्हायचा आहे ना? या महोत्सवासाठीं आम्हाला एक कारकून लागणार आहे. हे काम करायची आहे का तुझी तयारी?"

मास्तरानीं मान डोलवून 'होय' म्हटले. मग रावसाहेब म्हणाले–

" ठीक आहे. मग तुझी नेमणूक झाली असें समज. पगारबिगाराचें मागाहून पाहू. खर्चाला पैसे लागले तर आतून मागून घे आणि हें पहा, चाललास कोठें? आधीं त्या समोरच्या हौदातून चार बादल्या पाणी आणून दे मला, आणि आत विचार काहीं बाजारहाट करायचा आहे का तें. आज रात्रीं महोत्सवाचे कार्यकर्ते जेवावयास घरीं यायचे आहेत. त्या वेळीं वाढायसवरायला हजर रहा. नाहींतर देशील मागच्यासारखा गुंगारा नाटक बिटक संपलीं ना सगळीं? ."

मग महोत्सवाच्या या नव्या कारकुनानें रावसाहेबाना चार बादल्या पाणी आणून दिलें बाईनी सागितल्यावरून बाजारहाट केला, आणि अशीं बरींच कामे दुपारपर्यंत त्यानीं केलीं, तेव्हा कोठें घरीं जाण्यासाठी त्याची सुटका होऊ शकली जेवण-खाण आटोपून दुपारीं कामासाठीं लवकर येण्यास रावसाहेबानीं त्याना खरमरीतपणें फर्मावलें बाईसाहेबानीं दिलेले पैसे घेऊन मास्तर एका नव्या उमेदीनें तरातरा घरी परतले. ही उमेद आणि हा उत्साह नोकरी मिळाल्याचा नव्हता नाट्यमहोत्सवासाठीं काम करताना अगदीं जवळून हा उत्सव आपल्याला पाहायला मिळणार, इतकेच नव्हे तर राव-साहेबाच्या मागें दडून या उत्सवाला आपल्याला काहीं एक आकार देता येणार या कल्पनेचा हा आनद होता

त्या दिवशीं रात्री नाट्यमहोत्सवाच्या कार्यकर्त्यांचें जेवण आटोपून ते माडीवर रावसाहेबाच्या पाठोपाठ दिवाणखान्याकडे गेले तेव्हा बाईनीं मास्तराना म्हटलें—

" मास्तर, तेवढे तयार केलेल्या विड्याचें तबक वर नेऊन द्या, आणि दिवाणखान्याच्या शेजारच्या खोलींत आथरूणें घालून ठेवा "

त्याबरोबर मास्तरानीं आमटीचे पातेलें आणि ओगराळें खालीं ठेवलें, आणि विड्याचे तबक घेऊन ते तरातरा वर आले. रावसाहेबाच्या कुठल्याशा विनोदावर कार्यकर्ते सात मजली हसत होते विड्याचे तबक घेऊन जाणाऱ्या मास्तराना वाटले कीं ते आपल्यालाच हसत आहेत, औट घटकेचा नाटक कपनीचा मालक हातात आमटीचें पातेले आणि ओगराळें घेऊन उभा आहे म्हणून हसताहेत पण मग मास्तराच्या लक्षात आले की तसलें काहीं एक नाहीं त्याचे हंसणे दुसऱ्या कशाबद्दलचें तरी होतें. पाडू मास्तर त्या कार्यकर्त्यांच्या खिजगणतीतहि नव्हते त्याबरोबर मास्तराना हायसे वाटलें. अगदी सहजगत्या मास्तराचें लक्ष आपल्या हाताच्या बोटाकडे आणि पायाकडे गेले. त्याना फार विस्मय वाटला कारण मनात असा शरमिंदेपणा उत्पन्न झाला की जे हातपाय आणि ओठ वेडेवाकडे आगतुक नृत्य करू लागत, आणि आपल्या धन्याची प्रतिष्ठा, एखादी सभा उधळावी तशी उधळून लावीत, ते सात मजली हास्याच्या गडगडाटाने फारसे विचलित झाले नाहीत. ओठ एकमेकाच्यावर घट्ट बसले होते हाताचीं बोटें आणि पाय किंचित् थरथरले पण हातातले तबक पडू न देण्यासाठी आणि चालणाऱ्या पायावर शरीर सावरण्यासाठीं मास्तराना आटापिटा करावा लागला नाहीं. या गोष्टी अगदी सहजगत्या घडल्या. एखाद्या निरोगी माणसाच्या हातून घडाव्यात तशा घडल्या—आणि मग पाडू मास्तराच्या हेंहि लक्षात आलें की तम्मण्णाचार्यानीं सुचविलेल्या निसर्गोपचाराचा परिणाम आता दिसूं लागला आहे त्याक्षणी त्याना इतका हर्ष झाला की पानाचे तबक उधळून साऱ्या घरभर नाचावें, आणि भेटेल त्याला मिठी मारून ओरडून सागावें कीं, मी बरा झालों, व आता त्यातलें काहीं एक उरले नाहीं; आणि उरणार नाहीं. पण पाडू मास्तरानीं यापैकी काहीं एक केलें नाहीं. सहर्ष मुद्रेने त्यानी पाहुण्याच्या पुढें नुसते विड्याचें तबक केलें नाहीं, तर आग्रह करकरून एकेकाला दोन दोन विडे दिले, आणि रावसाहेबानी आथरुणे घालण्याची इशारत देताच मास्तर मुद्दाम त्याच्या समोरून

लगबगीने पळत गेले. आपल्यालासुद्धा पळता येते असेंच जणूं त्याना सुचवावयाचें होतें.

मास्तरानीं आथरुणें घालता घालता गादीवर बसून समोरच्या भिंतीला लावलेल्या सहाफुटी उच्च चकचकीत बिलोरी आरशात नजर टाकली क्षणार्धांत आथरूण घालण्याचें ते विसरले. मग ते आरशाजवळ गेले आणि 'झुंझार-रावा'च्या भाषणातले एक दोन महत्त्वाचे आशय त्यानी आपल्या मुद्रेवर अभि-नयित करण्याचा प्रयत्न केला. तों काय आश्चर्य ? 'तिळा उघड' म्हणताच प्रचंड पहाड बाजूला व्हावा, तसे मास्तराच्या मुद्रेवरील कसलेंसें दडपण दूर झालें बंडखोर स्नायू वठणीवर आले इच्छाशक्तीचा अधिकार लहान लहान मज्जातंतूवरहि प्रस्थापित झाला, आणि मास्तराना हवा होता तो अभिनय विहिर फोडता फोडता अवचित झुळझुळ झरा वाहू लागावा, तसा मास्तराच्या मुद्रेवरून ओसडूं लागला मास्तराचा हर्ष त्याच्या मनात मावेना. कुणाला तरी सागावें अशी उबळ त्याना येऊ लागली. कोणी नाही तर निदान कमळजा तरी—कमळजा ? कुठली कमळजा ? मास्तर आपल्या अनंत कालच्या स्वप्नात जागे झाले. समोर तुळशी—छे, कमळजा उभी होती. तिच्याकडे पाहात आरशासमोरचे झुंझारराव म्हणतात,

> " बिनमोल बायको आहे ! प्राण आहे माझा ! लाडके, या सर्व जगाचा लय होईल तरच तुझ्यावरच माझं प्रेम नष्ट होईल "

हे उद्गार आणि त्यातला आशय मनासारखा उमटताच झुंझारराव खूष झाले, आणि दुसरी एक बैठक घेऊन मुद्रेवर अपरपार वेदना उमटवीत झुंझारराव हलक्या आवाजात ओरडले—

> " चांडाळा, माझी लाडकी बदचाल आहे, ही गोष्ट तुला शाबीत करून दाखविली पाहिजे, समजलास ? अशीतशी नव्हे, प्रत्यक्ष मला दाखविली पाहिजेस नाहीतर-याद ठेव-हा झुंझारराव आहे आणि तू आहेस !..."

— असें म्हणत झुंझाररावानीं जाधवरावाच्या नरडीला हात घातल्याचा आविर्भाव केला.

— आणि त्या क्षणीं सिगारेटचा डबा आणण्यासाठीं रावसाहेब आत आले. पाडू मास्तराचे आरशासमोर चाललेले ते चाळे पाहून रावसाहेब हसून म्हणाले—

" काय रे चाललय तुझ ? आथरुण घालायची सोडून, लेका, आरशात छबी कसली न्याहाळतोस आपली ? "

त्याबरोबर मास्तर आपल्या सुषुप्तींतून जागे झाले ते खडखडीत भानावर आले आणि चागलेच वरमले मग ते मुकाट्यानें पुन्हा आथरुणें घालू लागले. सिगरेटचा डबा घेऊन रावसाहेब घाईने पुन्हा बाहेर गेले. आथरुणें घालता घालता मास्तराचे कान सहजगत्या दिवाणखान्यातल्या कार्यकर्त्यांच्या बोलण्याकडे टंवकारले गेले. नाट्यमहोत्सवात कोणकोणतीं नाटकें करावयाचीं याचा विचार कार्यकर्त्यांच्या बैठकींत चालला होता. क्षणभर त्यावरच रणधुमाळी माजून राहिली होती. 'सौभद्र'—'शारदे'पासून 'आधळ्याची शाळा' 'लग्नाची बेडी'पर्यंत अनेक नावाची उजळणी झाली ती मास्तरानी ऐकली आणि ते स्वतःशीं चकित झाले. नाट्यमहोत्सवासारख्या प्रसंगी 'झुंझारराव' नाटकाचे कार्यकर्त्यांना विस्मरण व्हावे याचे त्याना आश्चर्य वाटलें लोकसभेतील एकाद्या नामदाराच्या आवेशानें पाडू मास्तरानीं आथरुणावर उशी आपटली आणि उठून तरातरा बाहेर येत आगतुकपणे ते कार्यकर्त्यांना म्हणाले—

" काय हो ' झुंझारराव ' नाटकाची तुम्हाला आठवण नाही का ? नाट्य-महोत्सवात या नाटकाचा समावेश झालाच पाहिजे असें नाही तुम्हाला वाटत ? दोन महान् नाटककाराच्या प्रतिभा एकत्रित झाल्या आहेत या नाटकात ! "

पाडू मास्तराच्या या उद्गारानीं चकित होऊन सारे लोक त्याच्याकडे पाहू लागले. एक दोन कार्यकर्ते चटकन् म्हणाले—

" अरे खरेच ! आपण विसरलोंच होतों रामभाऊ, घ्या-घ्या पाहू टिपून ! "

त्याबरोबर रावसाहेब मास्तराच्या अगावर खेकसून ओरडले—

" पुरे पुरे ! समजली आपली अक्कल ! सागितलेलें काम कर जा आधीं ! मोठा शहाणपणाचा सल्ला द्यायला आहेस आम्हाला ! "

बिचारे पाडू मास्तर पुन्हा परत येऊन आथरुणें घालूं लागले.

" मग काय करायचें ? " कुणीसें रावसाहेबाना विचारलें. रावसाहेब साळसूदपणें मडळीचा अदमास घेऊन म्हणतात—" मी इतक्यात तुम्हाला तेंच सागणार होतों की झुझारराव नाटकाचा अन्तर्भाव आपल्या कार्य-क्रमात करणें समयोचित होईल. पण या पाड्याच्या बोलण्यानें विसरलों मी..."

आणि मग झुझारराव नाटक निश्चित झाले.

मग काहीं वेळानें बाहेरच्या बैठकींतलीं माणसें दुसऱ्याच एका विषया-वरून वाद करू लागली. कोणी म्हणाले कीं या नाट्यमहोत्सवात काहीं नावीन्य आणलें पाहिजे, काही नवीन प्रयोग केले पाहिजेत. हे तत्त्व सर्वांना मान्य झालें, पण तपशीलात एकमत होईना एकमेकाचे आवाजच नुसते चढू लागले हा वादविवाद ऐकून पाडू मास्तर पुन्हा एकदा अमर्याद उत्साहानें तरातरा बाहेर आले आणि म्हणाले—

" मी सुचवू का एक कल्पना ? लहान मुलाचे नाटक अद्याप कोठल्याहि महोत्सवात झालेले नाहीं. कृष्णाबाईच्या उत्सवात गावातल्या पोरानी 'सगीत बालध्रुव' हे नाटक केले होते. तें इतकें इतकें अप्रतिम वठवले कीं—"

कार्यकर्ते पाडू मास्तराची चमकदार कल्पना ऐकत असतानाच रावसाहेब डोळे गरकावून म्हणाले—

" तू कसली डोंबलाची कल्पना सुचवतो आहेस ? खालीं जाऊन थडगार पाणी घेऊन ये जा आधीं आणि हें पहा, गादीवर परीटघडीचे पलगपोस घालायचे आहेत हो ! बाईच्याकडून मागून घे तुला सापडले नाहीत तर !"

रावसाहेबाच्या उद्गारानीं पाडू मास्तर हिरमुसले झाले आणि ते खालीं जाऊ लागले. क्षणभर जिन्यातच थबकून त्यानी बैठकींतला सवाद ऐकला कोणीतरी म्हणत होते—

" हा मास्तर लेकाचा मोठा डोकेबाज आहे ह ! लहान मुलाचें नाटक बसविण्याची कल्पना मोठी छान आहे ! "

त्यावर रावसाहब नाक फेंदारून म्हणतात--

" अहो या पाड्याला कसलें आलें आहे डोकें ? कल्पना मूळची माझीच !

घरामध्यें बोलताना कधीं तरी लेकानें ऐकली असेल झालें! कृष्णाबाईच्या उत्सवात पोरानी काय कामे केली म्हणता? आपण तर बुवा चाट झालों!"

"आपण गेला होतात नाटक पाहायला?" कोणी एकानें सहज पृच्छा केली.

"छे, छे. मी नव्हतों गेलों. पण आपले वर्णन ऐकलें लोकाच्याकडून ते सागितलें. तेव्हा अगदीं हुकमी रंगणारा प्रयोग म्हणून मुलाचें 'बालध्रुव' हें नाटक कार्यक्रमात जरूर घालून ठेवा. वाटल्यास मी डायरेक्ट करीन–"

"वा! मग काय, फारच छान! रामभाऊ, टिपून ठेवा रावसाहेब स्वत.च पात्रें निवडतील आणि या नाटकाचे दिग्दर्शन करतील! काय हो, असेंच ना?" तपकिरीची चिमूट नाकात कोंबीत कृष्णराव म्हणाले.

मंडळींनीं माना डोलावल्या. हें सारे जिन्यात थबकलेल्या पांडू मास्तरानीं ऐकलें आणि त्याना विलक्षण हर्ष झाला. या हर्षाच्या भरात मघाचा अपमान ते पार विसरले. त्याचा हिरमुसलेपणा चटकन् मावळला. त्याचें मन, रडणारे बालक एकदम हसूं लागावें तसें प्रसन्न झालें. कसलातरी अमर्याद उत्साह त्याच्या रक्तात सळसळू लागला वास्तविक रावसाहेबानीं मास्तराच्या कल्पना मोठ्या साळसूद सफाईनें स्वतःच्या नावावर दडपल्या होत्या पण एरवीं याबद्दल बुद्धिमान् माणसाना वाटणारा विषाद मास्तराच्या मनाला स्पर्शहि करूं शकला नाही. स्वतःचें श्रेय थोडेसें जरी दुसऱ्याच्या पदरात पडलें तरी माणसें अन्यायाच्या गर्जना करून उठतात. पण मास्तराच्या बाबतीत आजच नव्हे तर या पूर्वीहि असें कधीं घडले नाहीं. कारण मास्तराना स्वतःचें असें काहींच नव्हतें. जें जें त्याना आवडलें, प्रिय वाटलें तें ते सारें काहीं त्यानीं इतर अनेकाना मनमुराद लुटू दिलें. अशा वेळीं इतराच्या मुखावर झळकलेला उल्हास पाहून ते अंतर्यामी तृप्त होत असत. आताहि तसल्याच तृप्तींत, तसल्याच उत्साहात ते गडबडीनें खालीं आले. खालीं येऊन ते क्षणभर इकडे तिकडे उगीचच धावले. मग त्याना आठवले कीं रावसाहेबानीं थंडगार पाणी आणायचा त्याना हुकूम केला होता झोपेंत चालणाऱ्या माणसाने वळकटी डोक्यावर घेऊन चालूं लागावें तसा समोरच्या तिपाईवरील भरलेला भला मोठा डेरा त्यानीं उचलला आणि मोठ्या कष्टानें सावरीत सावरीत दिवाण-

खान्यात आणला. तें पाहून मंडळी बुचकळयात पडली, आणि रावसाहेब गदगदून हसू लागले ते म्हणाले—

"पाडोबा, अरे हा डेरा कशाला आणलास ? आम्हाला प्यायला पाणी हवें आहे– आघोळीला नव्हे ! "

त्याबरोबर प्रचंड हशा झाला. आणि पाडूमास्तर भानावर येऊन, स्वतःकडे पाहून हसूं लागले !

• • •

# १४

नाट्यमहोत्सवाची तयारी इतकी जोरात सुरू झाली की गावातल्या कच्च्याबच्च्याच्या तोंडीं देखील तो विषय घोळूं लागला. लहान पोरें एकमेकात खूप खूप नाटकें होणार असल्याच्या गमती जमती बोलू लागलीं, तर मोठीं माणसें महोत्सवातील निरनिराळ्या समित्या, त्यावरील कार्यकर्ते, आणि त्याच्या काम करणाऱ्या पद्धति यावर खमगपणें टोळक्या टोळक्याने चर्चा करूं लागले. कुठलेंहि सार्वजनिक काम म्हटलें, कीं प्रत्यक्ष कार्य करणाऱ्या कार्यकर्त्यांपेक्षां, सल्लागाराचाच अधिक सुळसुळाट होतो. ते सल्लागार आप-आपल्या कल्पना माजघरात आणि स्वयंपाकघरात निरपराधी मंडळींना अकारण ऐकवीत असतात. नाट्यमहोत्सवाच्या बाबतींतहि असेच घडलें. परतु प्रत्यक्ष तिकिटें खपविण्यासाठी स्वयसेवक जेव्हा घरोघर फिरू लागले, तेव्हा घरातलीं कर्तीसवरती मंडळी निरनिराळया अडचणींच्या आड दडूं लागली. आणि अखेर नाइलाजानें कोणाच्या तरी दडपणामुळें तिकिटें घेऊं लागलीं. पण एखाद दुसऱ्या तिकिटाची खरेदी चालली असताना, ' हा महोत्सव करण्यापेक्षा दुसरी काहीं ' भरीव कामगिरी ' करणें किती अगत्याचें आहें, ' ते या स्वयंसेवकाना ही मंडळी खुलासेवार सागूं लागली.

महोत्सवाचे दिवस निश्चित झाले. त्यामुळें परगावच्या बऱ्या पाहुणे-

मंडळींशीं पत्रव्यवहार वाढला. या पत्रव्यवहाराचें काम रावसाहेबांच्या घरातलें कामधाम संभाळून पाडू मास्तराना पहावें लागलें. या महोत्सवासाठीं मोठमोठे नट आणि नाटककार यानीं उपस्थित राहण्याचें कबूल केलें होतें. त्याच्यासाठीं प्रतिनिधि-निवासाची सोय करणें जरुरीचें झालें. तेंहि काम पाडू मास्तराच्याच अंगावर पडलें. महोत्सवाच्या निमित्ताने होणाऱ्या नाटकातील पात्राच्या रंगभूषेची जबाबदारी तर मास्तराच्यावरच होतीच; परंतु माडवाची उभारणी व सजावट, रंगभूमीवरील नेपथ्यरचना इत्यादि अनेक गोष्टी प्रत्यक्षात साकार होत असताना मास्तरानाच प्रत्येक ठिकाणीं जातीने राबावें लागलें. कार्यकर्त्यांचे आणि स्वयसेवकाचे जथेच्या जथे कामासाठीं म्हणून उभे राहिले खरे. पण त्यांच्यापैकीं माहितगार कुणीच नव्हते. म्हणून प्रत्येक विभागातील कार्यकर्ते पावलोपावली मास्तराचा सल्ला घेऊन काम रेटूं लागले. हें सारे काम जिवापाड मेहनत घेऊन मास्तर करीत होते. पण त्याचें चित्त मात्र निराळयाच एका स्वप्नाभोंवतीं रेंगाळत होते.

नाटकाच्यासाठीं दिग्दर्शक नियोजित केले गेले. पण त्यात मास्तराचें कुणालाहि स्मरण झालें नाहीं. कोणी एका माणसानें टवाळखोरीनें मुलाच्या नाटकासाठी म्हणून त्याचें नाव सुचविलें होते. पण रावसाहेब स्वतःच या नाटकाचें दिग्दर्शन करणार होते. त्याच्या नावापुढें मास्तराचें क्षुद्र नाव कोलमडून पडावे हें स्वाभाविकच होतें. शिवाय मास्तराच्या मागे पत्र-व्यवहारापासून माडव परतणीपर्यंत अनेक व्यापताप लागले आहेत, त्यामुळें असली कामें त्याना झेपणार नाहींत—अशी पोक्त सहानभूति कोणी एकानें छद्मीपणे दाखविली. नाटकातील पात्राची निवड करण्यासाठीं छोट्या छोटया तज्ज्ञाच्या समिति कार्य करूं लागताच पाडू मास्तर झुझारराव नाटका-साठीं स्वतः आपण होऊन पुढे झाले. झुझारराव नाटकातील पात्राची निवड गावातील काही तथाकथित जाणकार करणार होते. आजवर ‘ हे जाणकार’ कोठे पसार झाले होते कोण जाणे ! पण नाट्यमहोत्सवाचा गलबला सुरू होताच असले ‘ किंचित्-तज्ज्ञ ’ थोरामोठयाच्या घरात प्रगट होऊं लागले. त्यातलेच काही महाभाग येथेहि उपस्थित होते. कमळजाचें काम

तुळशीबाईना देण्यात यावें ही मास्तराची सूचना या समितीनें चटकन् मान्य केली. बाईना विनती करण्यासाठी कोणी जायचे तेहि ताबडतोब ठरलें. एक दोन मोटारवाल्या माणसानीं हें काम मोठ्या तत्परतेने अंगावर घेतलें अशीच बारीक सारीक पात्राची निवड विशेष गाजावाजा न होता झाली. मग झुंझाररावाच्या पात्रासंबधींचा प्रश्न निर्माण झाला या कामासाठी नायिकेची निवड लक्षात घेऊन मोठ्या धोरणीपणानें पुढे सरसावणारे बरेच तरुण निघाले. पण त्याचा नाटक या पदार्थाशी संबध, खुर्चीवर बसून पेंगत पेंगत नाटक पहाण्यापुरताच आजवर आला होता. या इसमानी बृहन्नडेपासून राणा भीमदेवापर्यंत तऱ्हतऱ्हेच्या आवाजात झुझाररावाची भाषणे वाचून दाखवून तज्ज्ञांची व श्रोत्यांची भरपूर करमणूक केली.

पाडू मास्तर या प्रसंगी मागें दूरवर कोठे तरी उभे होते ते मग भीत भीत पुढे झाले. दबकत दबकत त्यानीं स्वतःचे नाव पुढें केलें. त्याबरोबर श्रोते खदखदून हसले, आणि तज्ज्ञाच्या मुखावरहि उपहासाचें स्मित झळकलें. त्यांपैकी कोणी एक कुत्सितपणें मास्तराना उद्देशून म्हणाला,

“ अहो मास्तर, ‘ झुझारराव ’ म्हणजे काही भावबधनमधला ‘मोरू’ नव्हे ! एखादें विनोदी नाटक घेऊ तेव्हा तुम्हाला बोलवू बरे ! ” या उद्गारानीं जमलेल्या लोकात प्रचंड हशा पिकला. फरशीवर एखादे भिंग पडून त्याचे तुकडे तुकडे व्हावेत तशी मास्तराच्या स्वप्नाची शकलें शकलें उडालीं ! मग कोणी एक उंच धिप्पाड माणूस तारस्वरात रेकून बोलू शकतो, आणि तो रावसाहेबाचा कुणी जवळचा नातेवाईकहि आहे, एवढ्याशा गुणावर ही भूमिका त्याच्या पदरात पडली. मास्तरानीं आपल्या आवडत्या भूमिकेचा अपमृत्यु उघड्या डोळ्यानीं पाहिला आणि निराश मनानें ते तेथून बाहेर पडले.

पण मग मास्तराच्यावर नवीनच एका कामाची जबाबदारी येऊन पडली. मुलाचें ‘ बालध्रुव ’ हें नाटक दिग्दर्शित करण्यासाठीं म्हणून रावसाहेबानीं बराच गाजावाजा करून मागून घेतलें होते. पण प्रत्यक्ष काम करण्याच्या वेळीं त्यातल्या अडचणी आणि अवघडपणा त्याना पदो-पदीं कळूं लागला अशा वेळीं प्रत्येक बाबतीत त्याना नकळत पांडू

मास्तराची मदत घ्यावी लागत होती रावसाहेबांनीं मुळात आधी नाटकच वाचलें नव्हते. त्यामुळे पात्राची निवड ते काय करणार—कपाळ ! शिवाय नाटकात काम करण्यासाठी म्हणून त्या दिवशीं इतक्या मुलाचा जमाव जमला होता कीं त्या छोटया दिवाणखान्याला एखाद्या मधली सुटी झालेल्या शाळेची अवकळा आली होती मुलेंच ती ! ती काय राव-साहेबाना ऐकताहेत थोडीच ! त्याना आवरताना रावसाहेबाच्या नाकीं नव आले. मग इथेंहि पाडू मास्तराना मधें पडावें लागलें. आणि पात्राच्या निवडीचें काम स्वतःलाच उरकावे लागले. त्यानी मनाशी फार दिवस योजून ठेवल्याप्रमाणें जाईला नाटकात बालध्रुवाची प्रमुख भूमिका दिली गेली. गावातल्या मुलातून काही चमकदार मुले त्यानीं इतर काही पात्राच्या साठी निवडली. मग त्याच दिवशीं दिग्दर्शक म्हणून रावसाहेबाच्या हस्तें मुहूर्ताचा नारळ फुटला रावसाहेबाना त्या प्रसगीं नाटकातील काहीं भाग मुलाना शिकवावा लागला. त्यावेळीं त्यांच्या लक्षात आलें कीं लोकल बोर्डातील अडेलतट्टू सभासदाच्या बैठका चालविणे एकवेळ परवडलें, पण ह्या नाठाळ कारटयाना शिकवणें नको रावसाहेब भाषणें शिकवूं लागले म्हणजे उगीचच भलतीकडे शिरा ताणून ओरडूं लागत; आणि नको त्या ठिकाणीं भुकेनें कासावीस झालेल्या माणसाप्रमाणे, त्याचा आवाज खालीं पडून खोल जाई वाक्य बरोबर जमले नाहीं कीं मग ते पोराच्यावरच तणतणू लागत. त्यामुळे समोरची पोरेसोरें गळा काढून भोकाड पसरीत असत किंवा कुत्र्या माजराचे आवाज काढून राव-साहेबाची चेष्टा करूं लागत. त्यामुळें रावसाहेबाची 'भीक नको पण कुत्रा आवर ' अशी स्थिति होऊन जाई. मुहुर्ताच्या दिवशी असा प्रकार घडला ऐन वेळी मास्तर रावसाहेबाच्या मदतीला धावले म्हणून सारें निभलें नाहीतर उधळलेल्या राजकीय पुढाऱ्याच्या सभेची अवस्थाच लहान मुलाच्या नाटकाच्या तालमीला प्राप्त झाली असती पण पाडू मास्तरानीं रावसाहेबाना मोठेपणा देऊन लज्जारक्षणाचा कठीण प्रसग त्यांच्यावर आणला नाहीं. त्यानी युक्तीने चार गोष्टी सागून मुलाना गप्प बसविलें. मग भाषणें वाचतानाहि ते इतके तन्मय होऊन शिकवू लागले कीं

मुलेंच नव्हे तर रावसाहेब देखील माना डोलवित त्याचा अभिनय तल्लीनतेनें पाहूं लागले! मग थोडया वेळाने कॉफीचे कप आले. मास्तरानीं रावसाहेबाना आणि मुलाना कॉफीचे कप दिले. ‘ कॉफी मोठी सुंदर झाली आहे,’ असें रावसाहेब मनापासून म्हणाले, आणि आणखी एक कप कॉफी मागवून घेतली. कॉफी पिता पिता रावसाहेबानीं मास्तराना उगीचच काहीं सूचना दिल्यासारखें केले. दिग्दर्शन कसे करावें, भाषणें कशी वाचावीत, अभिनयाचें स्वरूप कसे असावे याची मूलभूत माहिती त्यानी सविस्तर रीतीनें वर्णन करून सांगितली. मुले कॉफी पिण्यात मग्न झाली होती आणि मास्तर दुसऱ्याच कसल्या विचारात गुंग झाले होते. म्हणून रावसाहेबांना मनःपूत भाषण करता आले. एवढ्या प्रकारानंतर मुहूर्ताचा प्रसंग संपला.

दुसरे दिवशीं तालमीच्या वेळी रावसाहेबाना काहीं जरूरीचें काम निघालें म्हणून पाडू मास्तराना बोलावून त्यानीं म्हटलें—

“ हें पाहा पाडोबा, अजून माझ्या समोरचीं हीं कामें कांहीं संपली नाहीत. तेव्हा तूं पुढें हो आणि मुलाच्या नाटकाच्या तालमीला सुरुवात तर करून दे! तोंपर्यंत मी येतोंच आहे. आणि हे पहा, काल मीं तुला सांगितले ना, त्याच पद्धतीवर शिकव बरें का! म्हणजे मी अर्धा पाऊण तासात येतोंच आहे...”

मग पाडू मास्तर तालमीच्या ठिकाणीं गेले आणि नाटक बसविण्यास त्यानी आपल्या पद्धतीनें आरंभ केला. रावसाहेब आले, पण ते अगदीं कॉफीचे कप वाटले जात होते त्यावेळीं. रावसाहेबाना कॉफी मोठी चवदार लागली. फुरके मारमारून कॉफी पीत असताना रावसाहेबानीं जमलेल्या मुलाना आणि मास्तराना नाट्यशास्त्रावर बरीच माहिती सांगितली.

आणि मग असे रोजच होऊं लागले. तालमीच्या वेळीं रावसाहेबाना काहीतरी काम निघायचें, आणि पाडू मास्तरानीं पुढें जाऊन तालमीला आरंभ करायचा आणि रावसाहेब फक्त कॉफीच्या वेळी तेथें बिनचूक हजर व्हायचे. नाटकाला हळू हळू शिल्पकाराच्या दगडातून मोहोरणाऱ्या मूर्ती-प्रमाणे आकार येऊं लागला. रावसाहेबाच्या प्रकृतीलाहि कॉफी मानवूं

लागली. या नाटकासाठीं, विशेषतः जाईच्या कामासाठी, मास्तर अपरंपार कष्ट घेत होते. मुलाच्या कलाकलानें त्याना हवा असलेला अभिनय ते बसवून घेत होते आणि रावसाहेब त्यामुळेंच दिवसभर ठिकठिकाणीं मित्रमंडळीना सागत होते—

" हे नाटक बुवा विलक्षण गाजणार ! नाटकामधील मुलानाच नव्हे तर आमच्या पाडू मास्तराना देखील मी असा तयार केला आहे कीं लवकरच स्वतंत्रपणें एखाद्या नाटकाचे दिग्दर्शन करणें त्याला मुळीच अवघड जाणार नाहीं. "

मास्तरानीं घेतलेल्या कष्टापेक्षा रावसाहेबानीं मारलेल्या बढायाच जास्त प्रसिद्धि पावल्या आणि मग लौकरच रावसाहेबाच्या दिग्दर्शन कौशल्याबद्दल दूर दूर ख्याति पसरूं लागली.

नाट्यमहोत्सवाचे दिवस जसजसे जवळ येऊ लागले तसतसे मास्तराना अपरिमित कष्ट पडू लागले. कित्येक वेळा सकाळी ते जे घराबाहेर पडत ते रात्री बरेच उशीरा परत येत. त्याच्याकडून लहान-सहान कामेहि महोत्सवाचे चालक भरडून घेत. त्याच्या पायावर चक्र पडल्यासारखें उन्हातान्हातून ते अनवाणी वणवण करीत हिंडत असत. पण त्याना कामाला जुपणारी माणसें त्याच्या खाण्यापिण्याची कधींहि कदर करीत नव्हती. स्वतःची आबाळ करण्याबद्दल मास्तराना बयो तोंड टाकून काय बोलत असेल तेवढीच, पण इतर कोणाला त्याची दखल घेण्याची जरूरी वाटली नाहीं. खुद्द मास्तराना-देखील स्वतःच्या प्रकृतीची दरकार वाटेनाशीं झाली. महोत्सवाच्या सार्वजनिक जीवनात वावरणारीं माणसें काम करतात, नाहीं असें नाहीं, पण स्वतःच्या घरचें काम खोळबल्यासारखी उगीचच स्वतःला असें जनावरा-सारखे राबवीत आणि शिणवीत नाहीत. त्या काम करण्यातहि अशी माणसें स्वतःच्या भोवतीं 'लक्ष्मण-रेषा' आखून घेत असतात. पण तसे मास्तराचें काहींच नव्हतें घरच्या लग्नकार्यासारखे मास्तर महोत्सवाच्या कामासाठीं राबत होते त्यातले काहीं काम त्याच्यावर लादले गेलें होतें आणि कांहीं त्यानीं हौसेनें लादून घेतले होते. कामचुकार स्वंयसेवकाच्या काम करण्याच्या पद्धति त्याना या जन्मात तरी अवगत झाल्या असत्या कीं नाहीं कोण जाणें!

त्यामुळें त्याच्यावर सोपविलेलीं कामें स्वतःला जीवापाड शिणवून ते पार पाडीत होते.

वास्तविक ‘ बाल ध्रुव ’ नाटकाची तालीम आटोपल्यानंतर रोज त्याना घराकडे परतण्यास काही हरकत नव्हती, पण मास्तर आपण होऊन ‘ झुझार-राव ’ नाटकाची तालीम कशी काय चालली आहे, ते पाहण्यासाठी जाऊन बसत. या नाटकात बरीच बडी धेंडें रंगभूमीवर झळकणार होती. झुझार-राव ’ नाटकाचे दिग्दर्शन एका वृद्ध अनुभवी आणि जाणकार नटावर सोपविण्यांत आलें होते. परगावाहून सदर गृहस्थ या कामासाठीं मुद्दाम राव-साहेबाच्याकडे पाहुणे म्हणून येऊन राहिले होते. मास्तरानीं पूर्वी कधी त्याना पाहिलें नव्हते. पण रावसाहेब त्याना सलगीनें ‘ अण्णा ’ म्हणून संबोधूं लागल्यापासून मास्तरानींहि ते नाव उचलले, आणि मग मास्तराच्या तोंडून अनेकानीं तें नाव ऐकल्यावर सारेच त्याना ‘ अण्णा ’ म्हणून हाक मारू लागले. झुझारराव नाटकाच्या तालमी मोठ्या नीटनेटकेपणें सुरू झाल्या. अण्णासाहेबानीं त्यात काहीं एक शिस्त आणि पद्धति निर्माण केली. मास्तराना ती फार आवडली. ती शिस्तच नव्हे तर त्याची शिक-विण्याची पद्धतहि मास्तराना मनापासून पटली मास्तरानीं याबद्दल भेटेल त्याच्यापाशीं अण्णासाहेबाची तोंड भरून स्तुतीच केली असे नव्हे तर त्याचे मार्ग आणि त्याच्या पद्धति त्यानीं पाहून पाहून आत्मसात् केल्या. तालमीच्या वेळीं मास्तर अण्णाच्या शिकविण्याकडे एकाग्र चित्ताने पाहत बसत. कधी कधीं त्याना नवीन कल्पना सुचत पण संकोचानें म्हणा वा भीतीनें म्हणा, मास्तर त्या कल्पना आरंभी बोलून दाखवीत नसत. पण एकदा केव्हा तरी त्याचेकडून सहजगत्या ते धाडस घडले, आणि त्याच्या अपेक्षेपेक्षा निराळाच परिणाम त्याच्या प्रत्ययास आला. अण्णासाहेबानी मास्तराची सूचना नीट समजावून घेतली. त्याना ती पटताच त्यानीं मास्तराचें मनापासून कौतुक केलें पण झुझाररावाच्या कामाच्या बाबतीत इतके बारकावे काम करणाऱ्या त्या उंच धिप्पाड माणसाला जमेनात, आणि मग त्यामुळें स्वतः अण्णासाहेब आणि मास्तर दोघेहि वारंवार हताश होऊं लागले. मग अण्णासाहेबाच्या संमतीनें मास्तरानचि या कामाचें प्रात्यक्षिक करून

दाखवावें आणि जमलेल्या साऱ्या नटाना तें,मनस्वी आवडावें असें होऊं लागले. एकदा तर अण्णासाहेब मास्तराच्या अभिनयावर खूष होऊन त्याना म्हणाले—

" या नाटकातल्या पात्राची निवड झाली त्यावेळी तुम्ही तेथें नव्हतात काय ? ही भूमिका तुम्हालाच मिळणे जरूर होतें "

त्यावर त्या उंच धिप्पाड माणसाची मुद्रा गोरीमोरी झाली. आणि मग मास्तरानीहि उत्तराची टाळाटाळ केली. पण या एका भूमिकेमुळें एरवी बसत आलेल्या नाटकाला पाहिजे तसा उठाव मिळत नाहीं अशी अण्णासाहेब वारवार तक्रार करू लागले.

नाट्यमहोत्सवाला दहा बारा दिवसाचा अवधि राहिला होता महोत्सवासाठी शाळेच्या क्रीडागणावर भव्य शामियाना उभारला गेला होता. सजावटींतले बारकावे पुरे करून घेण्याचें काम जोरात चालू झालें होतें. नाटकातल्या नटाना सवय व्हावी एवढ्यासाठी या शामियान्यात उभारलेल्या रंगभूमीवर नाटकाच्या अखेरच्या तालमी घ्याव्यात असें दिग्दर्शकानीं ठरविलें. आणि मग रोज संध्याकाळीं आलटून पालटून एकेका नाटकाचा नटसंच या रगभूमीवर कामे करू लागला. 'झुझारराव' नाटकाची पहिलीच तालीम ज्या दिवशीं या जागी झाली त्यावेळीं नाटकातला झुझारराव शामियान्याचे तें भव्य स्वरूप पाहून चागलाच हबकून गेला होता. काम करताना त्याचे पाय लटलट कापूं लागले होते. घशाला कोरड पडली होती. आणि अभिनयाचे पाठ तो वारवार चुकत होता. तालीम कशीबशी सपल्यावर सदर झुझारराव अण्णासाहेबाना एकीकडे गाठून म्हणाले—

" काय हो ?— एवढा प्रचंड माडव प्रेक्षकासाठींच उभारला आहे का ?"

" नाहींतर मग ? प्रेक्षकासाठीच नाही, तर मग काय धान्याच्या गुदामासाठी ? "

त्याबरोबर झुंझारराव खजील होऊन गप्प झाले. अण्णासाहेबानीं त्याची मुद्रा लक्षपूर्वक हेरून म्हटलें—

" प्रेक्षकाची भीति नाही ना वाटत तुम्हाला ? नाहींतर फजितीला पारावार उरणार नाही हो ! घाबरलात की सपलेंच सारे. पूर्वी कधी कामे केलीं आहेत का ? "

या बोलण्यानें झुंझारराव चागलेच हादरले. त्याची मुद्रा केविलवाणी झाली. चाचपडत ते म्हणाले—

" होय, म्हणजे—शाळेमध्यें असताना नक्कल केली होती एकदा. "

मग अण्णासाहेब काहीच बोलले नाहीत. त्याची मुद्रा गंभीर झाली.

दुसरे दिवशीं झुंझारावाची प्रकृति नादुरुस्त झाल्यामुळे ते तालमीला आले नाहीत. तिसरे दिवशी निरोप पाठवूनहि ते आले नाहींत. चौथे दिवशीं तर ते गावातहि कुणाला दिसले नाहींत. मग बराच गवगवा झाला. खुद्द रावसाहेब झुंझाररावाच्या घरीं गेले. तेव्हा त्या भव्य शामियान्याची आणि त्यात बसणाऱ्या प्रेक्षकाची हाय खाऊन सदर झुझारराव काहीं कामाच्या सबबीवर फरारी झाल्याचे त्याना आढळून आलें. त्याबरोबर सचालकाच्या तोंडचें पाणी पळालें. त्याची दाणादाण उडाली. धावाधाव करून त्यानीं चारदोन माणसें वेठीला धरून आणलीं. पण अण्णासाहेबानी ती नापसत केलीं. परगावच्या काही प्रख्यात नटाना या कामासाठीं बोलवावें, अशी भाषाहि सुरू झाली. पण तितक्यात अण्णासाहेबानी स्वत. होऊन पाडू मास्तराचे नाव सुचविलें. या सूचनेनें सारे चालक स्तिमित झाले रावसाहेब तर म्हणाले—

" हा पाडोबा काय दिवे लावणार ? तुमचा काहीतरी गैरसमज झालेला दिसतो अण्णा. "

त्यावर अण्णासाहेब म्हणाले—" नाटकाच्या बाबतींत तुम्ही मला काहीं सागावें अशी परिस्थिति निर्माण झाली आहे का ? तसे असेल तर तुम्हीच या नाटकाचें दिग्दर्शन करा. "

ह्या उत्तरानें रावसाहेब चागलेच वरमले. मग त्यानीं कुरकुरतच मान्यता दिली. मास्तराचे सबंध नाटक पाठ होते त्यामुळें झुंझाररावाची नक्कल नव्याने पाठ करण्याचा काहीं प्रश्नच नव्हता. मास्तरानीं आत्मविश्वासाने झुझाररावाचें काम स्वीकारले. आणि त्या दिवसापासून या नाटकाच्या तालमीचा सारा नूरच पालटला !

●●●

# १५

त्यानंतर मास्तराचे जीवन 'झुंझाररावमय' झालें. स्वतःचें अस्तित्वहि ते विसरले. जेथे जेथें त्याना वेळ मिळे तेथें तेथें ते आपल्या भूमिकेच्या धुंदींत असत. जणूं ह्या भूमिकेचा त्याना कैफ चढला होता. ह्या कैफात कित्येक वेळा रस्त्यावरून जाताना ते हातवारे करीत असत समोरून जाणाऱ्या येणाऱ्या माणसाना हा गृहस्थ आपल्यालाच खुणावतो आहे कीं काय असें वाटत असे. ते रस्त्यातच थबकून क्षणभर डोळे विस्फारून पाहूं लागत. मास्तर कामाच्या निमित्तानें रेशन कचेरींत उभे असूं देत वा स्वयंपाकघरात पानावर बसलेले असूं देत, तेवढ्याशा एकांतातहि ते स्वत शीं झुंझाररावाचीं भाषणें पुटपुटूं लागत मास्तराच्या उरल्या सुरल्या खाजगी जीवनाला झुंझाररावाची जी अवकळा आली होती, ह्यावरूनच बयोला मास्तर नाटकात काम करीत असावेत असा सशय आला.

एरवी बयोच्यां कानापर्यंत ही गोष्ट जाऊ नये याची मास्तरानीं कट-वाल्याच्या दक्षतेनें संपूर्ण काळजी घेतली होती त्यानीं जाईला पढवून ठेवलें होतें, आणि त्याहिपेक्षा खरें म्हणजे स्वतःला वारंवार बजावून ठेवलें होतें. कारण आपल्याच उत्साहाच्या भरात या कटाचा परिस्फोट ते स्वतःच करण्याची जास्त शक्यता होती, आणि अखेर तसेंच झालेहि. एखाद्या कडक अधि-

काऱ्याच्या कठोरपणें बयोनें मास्तराची उलट तपासणी केली. आणि आरोपीच्या तोंडून तिनें गुन्हा वदवून घेतला. मग ती भारी संतापली. आजवर मास्तराच्या प्रकृतीसाठी त्याच्यावर न रागावण्याचे व्रतच जणू तिनें स्वीकारलें होतें. पण त्या व्रताची ही अशी फलश्रुति पाहून तिच्या अगाचा भडका उडाला. मास्तर या महोत्सवाच्या कामासाठीं, दिग्दर्शनासाठीं आणि आता या भूमिकेसाठीं स्वत.ला जे शिणवीत आहेत त्याचे परिणाम चागले होणार नाहींत याची तिला पूर्ण खात्री पटली त्यामुळे तिच्या सतापाला तळमळीची आणि तडफडीची धार आली होती. एखाद्या माणसाला जिव्हारी घाव लागावा आणि त्याच्या शरीराची तडफड सुरू व्हावी तसे सतापाचे शब्द तिच्या मुखावाटें आवेशाने धडपडत बाहेर पडत होते. मास्तराच्यासाठीं आजवर आपण किती कष्ट उपसले त्याचा पाढा तिनें त्याच्यासमोर वाचला मास्तरांनी कबूल करूनदेखील प्रकृतीची हेळसाड कशी केली याचे तिनें पुरावे दिले. त्याच्या अव्यवहारीपणाच्या झळा तिच्या ससाराला कशा ताप-दायक झाल्या, ह्याचाहि तिनें उल्लेख केला आणि मग अशा कितीतरी गोष्टी तिनें आपल्या बोलण्यात आणल्या. तिचें सारे बोलणे नुसते मनापासूनचें होतें असे नव्हे तर ते खरेंहि होते. त्यामुळे कडक शब्दात तिचा प्रतिकार करण्याची इच्छाहि मास्तराच्या मनात निर्माण झाली नाहीं. मास्तराच्या प्रकृतीची ठेव ही जणू तिचे धन होते, आणि त्याचा दुरुपयोग केल्यानें मास्तर अपराधी झाले होते. म्हणूनच एका शब्दानेंहि प्रत्युत्तर न करता बयोचें बोलणे मास्तर निमूटपणे ऐकून घेत होते. मग बयोने आपले बोलणें हताशपणें थाबवले तेव्हा मास्तर अगदी शातपणे म्हणाले—

"बये, तू म्हणतेस ते काहीं खोटें नाही तें न समजण्याइतका मी मूर्ख आहे का ? तुझ्याप्रमाणेंच मलाहि जगण्यासाठीं, बरे होण्याची उत्कठा लागली आहे, नव्हे का ? पण नुसते जगून मी करू काय ? गेलीं वीस वर्षे मी कसाबसा खुरडत खुरडत जगत आलो आहे. आता जवळ जवळ बरा झालों आहे अशा वेळी ज्यासाठीं मला बरें व्हावेसे वाटले तेंच जर माझ्यापासून तूं हिरावून घेऊ लागलीस तर जगायच तरी कशासाठी ?"

क्षणभर बयोहि निरुत्तर झाली. पण तसें तिने दाखविले नाहीं स्वयपाक

घरात जाऊन घुश्श्यातच ती कामाला लागली. बयो रागावली आहे हें मास्तरानी ओळखलें. तिच्या भडाभडा बोलण्याचें मास्तराना काहीं विशेष वाटत नसे. पण ती घुश्श्यातच अबोल झाली म्हणजे त्याच्या हृदयाची कालवाकालव होई. त्याना राहवेना म्हणून ते पुन्हा आत गेले परोपरीच्या शब्दानीं त्यानी तिची समजूत घालण्याचा प्रयत्न केला त्यानीं आपल्या प्रकृतीची तऱ्हतऱ्हेनें काळजी घेण्याचीं वचने दिलीं त्याच्या बोलण्यातल्या अनुनयाने मग बयोची कळी खुलली

पण मास्तरानीं दिलेली वचने सारीं खोटीं होती. ती ते पाळू शकतील अशी शक्यताच नव्हती. घरामध्ये विश्रातीच्या वेळीं थोडासा एकान्त मिळाला कीं लागलीच ते आरशासमोर हावभाव करून नक्कल म्हणूं लागत तेवढ्यात बयोची चाहूल लागताच, चोरून दुधावरील साय खाणाऱ्या एखाद्या माजरी· प्रमाणें ते कावरे बावरे होत. अशावेळीं झट्दिशीं आपल्या हातातलें पुस्तक पाठीमागे दडवीत घोंगडीवर बैठक मारून आढ्याचें निरीक्षण करीत ते घाईघाईनें विश्राति घेत असल्याचे नाटक करीत बयो मास्तराच्या त्या नाटकाला फसली तरी ह्या नाटकाला फसत नसे

झुझाररावाची भूमिका बसविण्यासाठीं मास्तर अतोनात कष्ट घेऊ लागले. घरींदारीच नव्हे तर तालमीच्या वेळीं देखील ते झुझाररावाचीं भाषणें आशयात भिजवून म्हणत असत. भाषणातील कोठलाहि शब्द उच्चारताना एखाद्या नृत्यागनेप्रमाणें तो आधीं मुद्रेवर उमटला पाहिजे, आणि त्याहि आधीं तो डोळ्यात प्रगटला पाहिजे, ह्यासाठीं ते स्वतःला शिणवूं लागले. नाटकाची अधिकृत तालीम सपल्यावरदेखील ते एकटेच, तयार होत आलेल्या रगपटात तासन् तास आरशासमोर बसत असत, आणि आपल्या मुद्रेवर कोणता अभिनय खुलून दिसतो, आणि कोणता दिसत नाही, कोणते भावाविष्कार परिणामकारक होतात आणि कोणते कोणते कोलमडून पडतात, भुवईच्या आणि ओठाच्या कोणत्या सहजगत्या झालेल्या हालचाली भाषणाला रग भरतात, अशा मुद्राभिनयाच्या अनेक बाबींचा ते बारकाईने अभ्यास करूं लागले. कधी ते आपली मुद्रा अत्यंत करुणार्द्र करीत. जिच्यावर मनःपूर्वक प्रेम केले, जिला सर्वस्व अर्पण केले ती कमळजा

जारिणी निघावी याचें अपरपार दुःख, वेदना, यातना, तडफड, क्रोध, अगतिकता, असहायता असे भाव एकापाठोपाठ एक--इंद्रधनुष्याचे सप्तरंगांतील रंग ऐकमेकात मिसळावेत, तसे त्याच्या मुद्रेवर उमटूं लागत. आणि सहजगत्या झुंझारराव बसल्या जागेवरून एकदम उठून उभे राहत. भावनाचा प्रक्षोभ अत्यंत कष्टानें आवरीत, प्रिय पत्नीचें प्रेम गमावल्यानें सृष्टीतच नव्हे तर स्वतःच्या अन्तर्जीवनातहि प्रलय झाल्याची समजूत करून घेऊन झुझारराव कमळजेच्या महालात प्रवेश करतो– कमळजा शातपणें पलंगावर निजली आहे. तिच्या उशाशीं एक दिवा जळत आहे. झुझारराव दारातच थबकतो, आणि स्वतःशीं उद्वेगाने म्हणतो—

" मना, तेच, तेंच कारण ! परमेश्वरा, या तोंडाने मी त्याचा उच्चार करू नये, पण कारण तेंच ! . "

दारातून झुझारराव पुढें येतो. आणि झोपलेल्या कमळजेच्या मुखावरील प्रसन्न निरभ्र भाव पाहून त्याच्या मुखावर आतापर्यंत संयमाच्या लगामामध्यें आवरलेला प्रक्षोभ, चमकून उधळलेल्या घोड्याप्रमाणें उसळून येतो. मनाचें समुद्रमथन चालले असतानाच आणि त्यातून क्रोधाचें हलाहल प्रगट होत असताना झुझाररावाच्या मुखावर एकाएकी कांहीं एक करुण कोमल छटा उमटू लागते– काळ्याकाभिन्न ढगाला चंदेरी कड असावी, तशी ! मग झुझारराव तरवार उपसतो, आणि परत खाली आणीत म्हणतो–

" छे छे ! या कोमल गौरवर्ण शरीरावर ही कठोर तरवार चालवून रक्तपात करणे माझ्या हातून होत नाही परतु प्राण हा घेतलाच पाहिजे नाहींतर ही आणखी कित्येकाचा असाच दगा करून घात करील. .... "

झुंझारराव तरवार म्यान करतो आणि आवेशानें तिच्याजवळ जातो. पण उशाशीं दिवा पाहून थबकतो. मग एकदा त्या दिव्याकडे आणि नंतर निजलेल्या कमळजेकडे अर्थपूर्ण दृष्टीनें पाहत तो उद्‌गारतो–

" पण अगोदर हा दिवा मालवावा, आणि मग हा दिवा माल्वावा "

झुंझाररावाच्या मुखावरून काळेकभिन्न क्रोधाचे ढग वितळूं लागतात. आणि करुण कोमल असे निळमर भाव अथाग जलाशयाप्रमाणें त्याच्या अंतःकरणांत गर्दी करूं लागतात. मग झुंझारराव आर्त स्वरात म्हणतो—

" पण तो दिवा मालविला तर वाटेल तेव्हा पुन्हा लावता येईल, पण लाडके, तुझ्या या अद्वितीय लावण्यमूर्तींतला प्राणदिवा एकदा जर मी मालविला तर तो पुन्हा लावता येईल अशी मन्त्रशक्ति माझ्यामध्ये कोठें आहे ? हें नाजूक गुलाबाचें फूल जर एकदा मीं खुडले तर अर्थातच कोमेजून गेलें पाहिजे "

झुंझारराव प्रणयभरानें खाली वाकून कमळजेचें चुबन घेऊ लागतो. चुंबनापाठोपाठ चुबने निर्माण होतात. अखेर अत्यंत अगतिकतेनें तिच्या मुखावर टक लावून पहात तो म्हणतो—

" .... लाडके, मी तुला मारतों, पण मेल्यावर तू अशीच रहा म्हणजे मी तुझ्यावर पहिल्यासारखी प्रीति करीन ! "

कमळजेला मारण्यासाठी झुंझारराव आपल्या मनाची तयारी करू लागतो. पण कारुण्य, धावत्या घोड्यावरून रिकिबीत पाय अडकून खालीं कोसळलेल्या स्वाराप्रमाणें, त्याला फरपटत नेऊं लागतें. झुंझाररावाच्या डोळ्यातून अश्रू ओघळू लागतात. त्याची जाणीव येताच झुझारराव असहायतेनें उद्गारतो—

" . हे अश्रू वाहू लागले पण मोठे दुष्ट आहेत हे जिच्यावर प्रेम तिलाच मारायच अ ? काय अलौकिक दु ख हें ? "

— अशा प्रकारचा अभिनय करताना मास्तर इतके रंगून जात कीं त्याचें देहभान हरपून जाई. प्रत्येक वेळीं अभिनयात नाविन्य आणि ताजेपणा आणण्याचा ते आटोकाट प्रयत्न करीत. त्याना अश्रूंच्यासाठी डोळ्यात कधी अंजन घालावे लागलें नाहीं, वीरश्रीसाठीं हातापायाची यात्रिक आदळआपट करावी लागली नाहीं, किंवा दिलखुलास हास्य वठविताना त्याना अकारण ओठाच्यावर बळजबरी करावी लागली नाहीं. ते शब्दाची आराधना करीत नसत तर नाटकातील भूमिका हीच कोणी देवता आहे अशा कल्पनेनें, तिच्याशीं एकरूप होण्याचा ते प्रयत्न करीत. त्यामुळे ही भूमिका ज्या ज्या रसातून घोळत जात असे, ते ते रस मास्तराच्या हृदयात सहजतेने उचंबळून येत. शब्दाचें निर्माल्य होतें, पण जिवत रसरसलेल्या भावना कधीं कोमेजून जात नाहीत. मास्तराच्या अभिनयात ताजेपणा येऊ लागला होता, याचें कारण तरी हेच

मुद्रेवरल्या अभिनयाचीच ही गोष्ट नव्हे तर, मास्तराच्या देहातील कणाकणातून व्यक्त होणाऱ्या आशयाचेंहि असेंच होतें. झुंझाररावाची भूमिका ही एका तडफदार पण दुर्दैवी वीर पुरुषाची भूमिका होती तिला साजेलसा वागण्या-चालण्यातला डौल, उभे राहण्यातला नोकझोंक, बसण्यातली ऐट, यासारख्या अनेक बाबी मास्तरानी मोठ्या बारकाईनें आत्मसात् केल्या होत्या. झुझाररावाचा सगय आणि त्याचा मनस्ताप

त्याच्या नुसत्या मुद्रेवर प्रकट होऊन थांबला नाहीं तर त्याच्या हालचालींतहि तो दिसूं लागला ज्यावेळी ओठावाटे शब्द उसळत—

" आज रात्री तिचा चेदामेदा करतो, मुडदा पाडतो कारण, हे पहा—माझं हृदय शुद्ध पाषाण बनलं आहे हा हात सुद्धा झणझणतो आहे पहा "

त्या वेळी विजेच्या चापट्यानें मास्तर रंगभूमीवर थैमान घालीत असत. पण दुसऱ्याच क्षणीं एकदम बरसणाऱ्या ढगाप्रमाणें विरघळल्यासारखे त्याच्या तोंडून उद्‌गार निघत—

"पण जाधवराव हिच्यापेक्षा खूबसुरत बायको दुनियेत नाहीं सापडायची ! "

मध्येंच ते थबकून उभे राहत. आणि मग विषप्रयोग झालेल्या माणसा-प्रमाणें अंगागांतून वेदना प्रकट करीत ते त्वेषानें बोलूं लागत—

" जाधवराव, थोडें जहर द्या आणून, म्हणजे आज रात्रीं बोलतसुद्धा नाहीं तिच्याशीं "

कमळजाशीं बोलताना परिश्रमानें गिळून टाकलेला क्रोध उपरोधाच्या आवरणांतून ते व्यक्त करीत—

" तुझ्या आचरणाबद्दल सशय ? भलतच ? तू केवढी पतिव्रता ! तारा, मदोदरी सुद्धा तुझ्यापुढे काही नव्हत यापेक्षा झाली नसतीस तर बेहत्तर होतं "

आणि मग ज्वालामुखी उसळून लाव्हारसाचे पूर वाहावेत आणि सभोंवतालचा प्रदेश भस्मसात् व्हावा तसा रगभूमीवर थयथयाट करीत ते ओरडत——

" तुझी ही सुदर मूर्ति ' कसबीण ' हा शिक्का मारण्यासाठी घडविली वाटत ? पातक कोणत घडल म्हणते ! बेशरम ! तुझ्या पातकाचा नुसता उच्चार करीन तर लज्जा जळून खाक होईल ! ते पहा चद्रानसुद्धा डोळे झाकले, वारा पृथ्वीच्या पोटात दडून बसला "

आणि अखेर कमळजेचा खून झाल्यानंतर आणि वस्तुस्थिति झुझाररावाला समजल्यानतर मनाच्या वेदना, त्याचा पश्चात्ताप आणि पश्चात् विलाप व्यक्त करताना मास्तर रगभूमीवर अक्षरशः धाय मोकलून रडत असत——

" केवढा अधम चाडाळ मी ! यमदूत येऊन या पुण्य लक्ष्मीपासून मला फरफर ओढून नेऊन माझ्या अगाच्या चिंध्या उडवील तर बर, मला गधकात होरपळून काढतील तर चागल ! रसरशीत अग्निकुंडात झुगारून देतील तर फार उत्तम ! लाडके ! गेलीस ना ! लाडके ! हाय हाय ! ! "

अशा रीतीनें या भूमिकेंतल्या बारीक सारीक छटा रसरशीत आणि जिवंत करण्यासाठीं मास्तर दिवसरात्र शिणूं लागले. हा अभिनय करताना

शरिरातील सारी गात्रें एखाद्या इमानी नोकराप्रमाणे तत्परतेनें त्याच्या सेवेला धावत आणि म्हणूनच क्षणाक्षणाला निरनिराळे रगरूप धारण करणाऱ्या ढगाप्रमाणे त्याच्या अभिनयातून वि.विध रंगाचे पाट खेळू लागत.

मधून मधून मास्तराच्या उजव्या हाताची बोटे त्याच्याशी बडखोरी करीत नको तेथे त्याची चलबिचल सुरू होई. मास्तरानी विचारपूर्वक त्यावरहि तोड काढली. आवेशपूर्ण भाषणाच्या ओघात आपल्या हाताच्या बोटाचें वैगुण्य दिसू नये म्हणून एक तर तो हात आपल्या कमरेवरील तरवारीच्या मुठीवर ते ठेवीत, अथवा मनस्तापाने येरझारा घालताना नेपोलियनप्रमाणे तो हात डौलदारपणें पाठीवर घेत असत डावा पाय कधी कधी मध्येच भूकप झाल्याप्रमाणे थरथरू लागे. अशा वेळी सहजगत्या मंचकाच्या अथवा कोणत्याहि आसनाच्या आड स्वतःचा पाय झाकून घेण्याचा त्यानी सराव केला पण हे सारें इतक्या सहजतेने होई की चोखदळ दृष्टीच्या प्रेक्षकानाहि त्यातला कृत्रिमपणा उमगत नसे

'झुझारराव' नाटकाची रंगीत तालीम झाली त्या रात्रीं मास्तराचे हे सारे अभिनयवैभव दुथडी भरून वाहिले. महोत्सवाचे चार दोन दुय्यम कार्यकर्ते आणि स्वतः दिग्दर्शक एवढीच माणसें या प्रयोगाला हजर होती. प्रयोग संपल्या-नतर साऱ्या नटानीं आणि दिग्दर्शकानीं त्याच्यावर अभिनंदनाचा वर्षाव केला. पण त्याचा उमद्या मनानें स्वीकार करण्याच्या मनःस्थितींतच मास्तर नव्हते. रगपटात मास्तर कितीतरी वेळ तसेच खिन्नपणें बसले होते. आपल्या मुखावरील रग काढून आणि पोषाख बदलून तुळशी सहज्गत्या जवळ आली आणि म्हणाली—

"फार सुंदर काम केलेत तुम्हीं मग आता तुमच्या मुखावर खिन्नता काय म्हणून ?"

मास्तर भानावर आले आणि म्हणाले—

"झुझाररावानें मला झपाटलें आहे. प्रयोग सपला पण माझे झुझाररावाचें दुःख काही सपले नाही!"

ते काय म्हणाले ते इतर कुणालाहि समजलें नसलें तरी तुळशीला मात्र समजलें ती म्हणाली—

" आता नाटकाच्या दिवशीं तुमच्याकडून असेंच काम वठलें म्हणजे या दुःखाचें सार्थक होईल ! "

" कुणास ठाऊक ! प्रयोग पुन्हा पुन्हा होऊं शकतात; पण रंगदेवता नटावर नेहमीच प्रसन्न होईल असें नाहीं !"

●●●

# १६

अखेर नाट्यमहोत्सवाला आरंभ झाला !

या नाट्यमहोत्सवासाठी ठिकठिकाणचे पाहुणे बहुसंख्येनें आले होते. नामांकित नट, नाटककार आणि नाट्यप्रेमी रसिक यांची खेचाखेच झाली होती. त्यांची सरबराई करता करता कार्यकर्त्यांची, विशेषतः सर्वांना परिचित म्हणून रावसाहेबांची आणि त्यांचे उजवे हात म्हणून पाडू मास्तरांची फारच तारांबळ उडाली. मास्तरांनीं जिवाचा आटापिटा करून प्रतिनिधि-निवासात उतरलेल्या पाहुण्यांची सारी सरबराई करण्याचा प्रयत्न केला होता. पण त्यातूनहि उठल्या सुटल्या तणतणणारे आणि कार्यकर्त्यांना शिणविणारे पाहुणे असतातच. दाढीला लागणाऱ्या गरम पाण्यापासून तों जेवणात कच्च्या राहिलेल्या चपातीपर्यंत हरएक प्रकारच्या तक्रारींना मास्तरच तोंड देत होते. त्याचा परिणाम इतकाच झाला कीं, महोत्सवाला आरंभ झाल्यापासून मास्तरांना एक क्षणभरहि ‘ झुंझारराव ’ नाटकाचें पान उघडण्यास फुरसत झाली नाही. त्याची विशेष जरूरी होती असें नव्हें. पण ज्या प्रकारच्या कामात मास्तरांची परवड चालली होती तिला भिऊन त्यांच्या मनातला झुंझारराव, रुसून घर सोडून चाललेल्या मुलाप्रमाणें दूर दूर कोठेंतरी चालला होता.

महोत्सवाला रावसाहेबाच्या भाषणापासून आरंभ झाला. हे भाषण राव-साहेबानीं स्वतःच लिहून काढलें होते, म्हणजे त्यानीं ते तोंडानें सांगितलें होतें आणि पाडू मास्तरानी लिहून घेतलें होते,—म्हणजे पाडू मास्तर लिहीत होते, लिहिलेले वाचून दाखवीत होते आणि रावसाहेब धूम्रपान करता करता एखाद्या दुसऱ्या शब्दाची दुरुस्ती सुचवीत होते. असें हें भाषण रावसाहेबानी प्रेक्षकानी भरगच्च भरलेल्या मांडवात आवेशपूर्ण रीतीनें वाचून दाखविले. या भाषणाचें लोकानी भारीच कौतुक केले. मग अध्यक्षाचे भाषण झालें. त्यानी आपल्या भाषणात रंगभूमीच्या अधःपाताची जुनीपुराणी झालेली चर्चा नव्या हिरीरीने केली. कुठल्याहि भाषणानंतर ज्याना टाळ्या वाजविणें एवढेंच माहीत आहे, असल्या प्रेक्षकानी त्याचें कौतुक केलें. मग दुपारीं कसलीशी चर्चा झाली. या चर्चेतहि 'कुलीन स्त्रियानीं नाटकात काम करावें किंवा नाहीं,' 'नाटककाराना मोबदला किती मिळावा,' 'नाटकगृहाच्या मालकानीं आपल्या ताब्यातील नाटकगृहें कोणकोणत्या कारणासाठी वापरावींत,' अशा अनेक जिव्हाळ्याच्या विषयाचा कंटाळवाणा काथ्याकूट झाला. दुसरे दिवशीं जुन्या गाजलेल्या नटाचा अध्यक्षाच्या हस्तें सत्कार करण्यात आला. म्हणजे या नटानीं केलेल्या त्यागाबद्दल, नाट्यकलेच्या त्याच्या वेडाबद्दल, आणि या कलेला त्यानीं वाहिलेल्या आपल्या जीवनाबद्दल, समजणाऱ्या आणि न समजणाऱ्या माणसानी तोंड भरभरून भाषणे केलीं. तसेच गावातल्या 'मित्रविहार मंडळा'पासून तों 'हनुमान् हॉटेलपर्यंत' अनेक संस्थानी त्याच्या गळ्यात हार घालून आपली प्रसिद्धि करवून घेतली महोत्सवातर्फे या नटाना कांहीं मूल्यवान् वस्तु नजर करण्यात आल्या. पाडू मास्तर अध्यक्षाच्या जवळ उभे राहून एकेक वस्तु त्याच्या हातात देत होते आणि अध्यक्ष एकेका नटाची संभावना स्वतः जातीनें करीत होते. आणि मग असलेच काही शोभेचे कार्यक्रम होत होत 'झुंझारराव'च्या प्रयोगाची रात्र उजाडली.

मास्तर संध्याकाळी रंगभूषा करण्यासाठीं रंगपटात गेले तरी त्याच्या मागची कार्यकर्ते आणि स्वयंसेवक याची भुणभुण संपली नाही. रंगभूषेंत मास्तराना एकाग्र चित्त होऊं न देण्याचा जणूं या सर्वांनीं विडाच उचलला

होता ज्याला ज्याला म्हणून कसलीहि शकाकुशका आली तो तो इसम थेट या 'महोत्सवाच्या ज्ञानकोशा'कडे धाव घेत होता प्रतिनिधि-निवासातल्या आचाऱ्यापासून तो नाटकगृहातल्या द्वाररक्षकापर्यंत अनेक इसमानीं या कार्याला हातभार लावला, तरी मास्तराच्या मनाची शाति ढळली नाही ते एका बाजूला सर्वांना शातपणें उत्तरे देत होते आणि दुसऱ्या बाजूला आपल्या मुखाची रगभूषा काटेकोरपणे करीत होते. बघता बघता नाटकाची वेळ झाली. नाट्यगृह सर्व तऱ्हेच्या प्रेक्षकानीं चिक्कार भरलें. उशीरा येणाऱ्या बडया माणसाना एक तर तिष्ठत उभे रहावे लागलें नाहीं तर चरफडत परत जावे लागलें

रंगदेवतेची पूजा झाली. धूप जाळण्यात आला. रगपटात प्रसाद वाटण्यात आला—आणि मग तिसरी घंटा झाली. उखळींचे बार झाले. आणि डाळिंबी रगाचा मखमली पडदा झगझगीत रोषणाईत वर गेला. दुसऱ्याच प्रवेशात झुंझाररावाच्या भूमिकेंत मास्तर रंगभूमीवर प्रगट झाले. आणि भूमिकेचा बोजा सावरीत मोठ्या आत्मविश्वासानें जाधवरावास ते म्हणूं लागले——

"शिवाय जातकुळीबद्दल म्हणाल तर तुम्हाला म्हणून सागतो, मी जरी जातीचा कोळी असलों तरी काहीं हलका नाहीं—सरदाराचा बच्चा आहे"

या उद्गारांतच मास्तरानी केलेल्या अभिनयामुळें त्यानीं प्रेक्षकाच्यावर चागलीच छाप मारली. आणि पुढें नाटकातले बारकावे जसजसे प्रगट होऊं लागले तसतसे प्रेक्षक खुषीनें त्याच्या कामावर बेहोष होऊ लागले.

मग नाटक दुसऱ्या आणि तिसऱ्या अकातून तडफेनें पुढें गेलें. मधल्या अंकात मास्तराच्यावर अनेकानीं अभिनंदनाचा तर कोणी विस्मयानदाचा वर्षाव केला. त्यामुळें मास्तराच्या अंगीं विलक्षण उमेद संचारली. बाहेर

नाट्यगृहात देखील मोठे जाणकार नट म्हणूं लागले कीं, असलें काम फार दिवसानी बघायला मिळतें आहे. ज्याना कोणाला माहीत नव्हतें तीं माणसें मास्तराच्याबद्दल माहिती करून घेऊ लागलीं. ज्या गावकरी माणसानीं आजवर पाडू मास्तराना खुळ्यात काढलें तीं माणसें चकित होऊन, " हें असें कसें झाले—आपल्याला वाटलें नव्हतें बुवा—" असें काहीसे दुबळे शब्द बोलू लागले. रावसाहेब मोठ्या थाटात अध्यक्षाच्या शेजारीं कोचावर बसले होते. नाटक पाहात असता माना डोलवून ते अध्यक्षाच्या कानात पाडू मास्तराना आपण 'कसा तयार केला' हें सागत होते. मास्तरानी एखादा सुंदर अभिनय केला कीं तो आपणच त्याना सुचविला होता असे रावसाहेब मोठ्या विनयानें सागत असत. नाट्यगृहाच्या मध्यभागीं कोठेंतरी मामासाहेब बसले होते. एरवीं ते सहसा कुणाला दिसले नसत. पण समोर नाटक चालू असता आपल्या भसाड्या आवाजात ते आजूबाजूच्या माणसाना नाटकाची गोष्ट समजावून सागू लागले. आजूबाजूच्या प्रेक्षकानीं शुक् शुक् करून त्याना गप्प बसविण्याचा प्रयत्न केला. पण मामा त्याना कसली दाद देणार ! ते उलट खेकसून लोकाना बजावीत—

" मी या पाडू मास्तरच्या बायकोचा मामा आहे, समजलात ? जास्त गडबड केलीत तर मास्तराना सागून नाटक बद करायला लावीन ! "

आणि मग असेंच काहीसें तणतणत मामासाहेब मिटक्या मारमारून, शाबासकीचे शब्द मोठ्यानें उच्चारत नाट्यरसाचा आस्वाद घेऊ लागले नाट्यगृहातल्या इतर प्रेक्षकाना नाटक फक्त पाहायला मिळाले पण मामाच्या आजूबाजूच्या प्रेक्षकाना, मामानी, या नाटकाचा विषय काय, त्याची गोष्ट कोणती, त्यांतून उपदेश कोणता घ्यायचा, इत्यादि अनेक बाबी सविस्तरपणें पंतोजीच्या थाटात समजावून दिल्या. त्याला इतर प्रेक्षक मात्र मुकले ! बायकाच्यात बसलेली बयोदेखील नाटक चालू असतांना झुंझाररावाचे काम करणारे मास्तर आपले यजमान आहेत असे वारवार बजावून आजूबाजूच्या बायकाना सांगत होती. झुंजाररावनें कमळजेशी थोडासा लडिवाळपणा करतांच मात्र तिच्या जिवाची घालमेल होत होती. तिच्या माडीवर बसून जाई

मात्र एकाग्र चित्ताने अखेरपर्यंत नाटक पाहत होती. बयोनें दहा वेळां तिला जागरण करूं नकोस म्हणून सांगितले. पण ती तशी तिष्ठत ताटकळत बसून नाटक पाहण्यांत रमली होती. तिला नाटकातलें काहीं समजत होतें कीं नव्हतें कोण जाणे ? पण त्याची जरूरीहि नव्हती. तिला आपल्या वडिलाचें काम बघायचें होते, आणि मोठ्या भक्ति-भावानें ते पाहण्यात तिची समाधि लागली होती.

अशा रीतीने नाटक दुसऱ्या आणि तिसऱ्या अंकातून मोठ्या तडफेनें पुढें गेलें. चौथा अंक सुरू झाला. मास्तरानीं रंगभूमीवर प्रवेश केला. कधी नव्हे ती त्याची दृष्टि सहजगत्या प्रेक्षकातील पहिल्या काही रांगांवरून फिरली. एक व्यक्ति दृष्टीच्या कक्षेत येतांच ते एकदम चकित होऊन तिच्याकडे रोखून पाहू लागले. त्याना तो चेहरा ओळखीचा वाटला. पण ती ओळख कुठली असावी हें काहीं त्याच्या लक्षात येईना. पायांत मोडलेल्या कुसळा-सारखा हा विचार त्याना त्रस्त करूं लागला. कोणीतरी बड्या घराण्यातली ती बाई असावी. मोठ्या छानछोकीच्या पोषाखात लाडिक नखरे करीत ती बसली होती. तिच्याभोवती चार छानछोकीच्या पोषाखातली माणसें गोंडा घोळत राहिली होती. चौथ्या अंकातला पहिला प्रवेश संपवून मास्तर आत आले आणि एका कार्यकर्त्याला बुइंगमधून त्या स्त्रीकडे बोट दाखवून त्या स्त्रीबद्दल त्यांनी माहिती विचारली. त्याबरोबर तो इसम डोळे विस्फारून आश्चर्यानें म्हणाला—

" ह्या बाई तुम्हाला माहीत नाहीत ? प्रसिद्ध सिनेतारका अमलादेवी त्या ह्याच ! " असें सांगून तो कार्यकर्ता कोठेसा चालता झाला. विद्युत्पात व्हावा आणि आधारलेलें आसमंत उजळून जावें तशी मास्तराच्या मनाची अवस्था झाली. त्याची बालपणाची जी अमला ती हीच याबद्दल त्याना तिळमात्रहि शंका उरली नाहीं. वडिलाच्या मांडीवरून उठून, पाडूला गद-गदा हालवून, ' अस कायरे, म्हण ना ? ' असे म्हणणारी अमला ती हीच ! ! वाट चुकलेल्या वाटसरानें सहजगत्या कुठल्या तरी गुहेंत प्रवेश करावा तसे मास्तर भूतकालात शिरले. आणि त्याच्या मनाची विलक्षण तगमग सुरू झाली. तेवढ्यात तुळशीनें त्याना म्हटलें—

" चला, तुमचा प्रवेश आला. "

रंगपटात जाऊन मास्तरांनी आरशात डोकावले, आणि मग घाईने ते रंगभूमीकडे जाऊ लागले. मध्येच त्याना आपला डावा डोळा लवूं लागल्याची शंका आली आणि ते चरकले घाईने ते पुन्हा मागें परतले. रंगपटात येऊन क्षणभर आरशात त्यांनी डोकावून न्याहाळून पाहिले आपला डोळा खराच लवत होता की आपल्याला भास झाला?—हे त्याना उमजेना. पण विचार करायला त्याना वेळच नव्हता. थरथरत्या मनाने त्यांनीं रंगभूमीवर प्रवेश केला.

रंगभूमीवर प्रवेश करून मास्तरांनीं भाषणाला आरंभ केला. पण त्यांचीं भाषणें वेचव होऊ लागली, आधीं निर्माण झालेल्या रसाशीं ती इमानदारी राखीनाशी झालीं नाट्यरसाचा झरा तीं गढूळ करू लागली. मास्तरानाहि तें कळत होते. पण त्याचा इलाज चालेना आपल्या बंडखोर मनाला ताब्यात आणण्याचा ते प्रयत्न करूं लागले. पण नाठाळ घोड्याप्रमाणे तें भलतीकडेच भडकूं लागलें मास्तर वारवार रंगभूमि विसरूं लागले त्याच्या दृष्टीसमोरचा अफाट जनसमुदाय वितळून जाऊं लागला. आणि त्याच्या दृष्टीला छानछोकीच्या पोषाखातील अमला दिसू लागली. तेवढ्यात अमलादेवींने मास्तरांच्याकडे पाहून ओळखीचें स्मित केलें तें स्मित होतें कीं तीं हंसत होती? खदखदून हंसत होती? हसता हसता आपल्या दोस्ताना काही सांगत होती. सांगता सांगता रंगभूमीकडे बोटे दाखवित होती तिचे दोस्त किंचित् वाकून गंभीर मुद्रेनें ऐकत होते आणि मान उंचावून मास्तराच्याकडे पाहत होते हें सारें खरेंच होतें कीं हा भास होता? मास्तराना काहींच समजेनासे झालें अमलादेवींचें बोलणें त्याना ऐकू येत नव्हते, परंतु तिचे फक्त हातवारेच त्याना दिसत होते हंसता हसता ती हातवारे का करत होती? जणू आपलीच नक्कल करण्यासाठी की—आणि मग वारवार ते बोलता बोलता अडखळू लागले. त्याबरोबर पिटात बसलेलीं माणसें या बेरंगानें चिडून "प्रॉम्टींग...प्रॉम्टींग.. म्हणून ओरडू लागले. वुइंगमध्ये दडलेले प्रॉम्टर घाईघाईने हातवारे करून त्याना काहींसे सांगू लागले त्याचें बोलणेंहि मास्तराना ऐकू येईना. त्याना नुसते हातवारेच दिसूं लागले. नुसते बोटाचे चाळेच दिसूं लागले नुसत्या विस्फारलेल्या वेड्यावाकड्या मुद्राच दिसूं

लागल्या. ते शब्दांशी चाचपडू लागले. त्याच्याजवळ उभ्या असलेल्या कमळजेने हलक्या स्वरात म्हटले—

" माझं भाषण सपलं, आता तुमचं "

त्याबरोबर उगीचच तरवारीला हात घालून ते म्हणाले—

" काय म्हणालीस ? " त्याबरोबर पुढल्या रागेतील प्रेक्षक खदखदा हसले !

कमळजा सहजगत्या जवळ येत पुन्हा हलकेच म्हणाली—

" अहो अस काय करता ! मी तुम्हाला तुमचें भाषण सागते आहे, म्हणा—

" देवाच्या मनात मला दु खात कुजून माझी कसोटी पहायच आल असतं "

तेवढ्यांत मास्तर किंचित् भानावर आले आणि गडबडीने म्हणूं लागले—

" . देवाच्या मनात मला दु खात कुजून माझी कसोटी पहायच आल असत, त्यानें माझी कितीहि हालअपेष्टा केली असती, मला अगदीं भुकेकगाल करून टाकल असत, निराश करून जन्मभर कैदेत कोडल असत, तरी मी फारसा डगलो नसतो. पण लोकानी एकसारखीं बोट दाखवावीत म्हणून, परमेश्वरा, मला कायमचा पुतळा करून ठेवलास हें मी कस सहन करू ? "

......एकसारखीं बोट दाखवावीत म्हणून......

......एकसारखीं बोटं दाखवावीत म्हणून......

......एकसारखीं बोटं दाखवावीत म्हणून......

चालता चालता माणसानें पाय घसरून सपशेल तोंडघशीं पडावें तसे मास्तर या शब्दाना ठेचकाळून कोलमडले. बोटे दाखवावींत म्हणजे काय ? झुझाररावाकडे लोकानीं बोटे दाखविण्यासारखी त्याच्याहि हातापायाची हालचाल वेडीवाकडी होत होती का ? त्याचेहि डोळे लवत होते काय ? त्यांचेहि ओठ फुरफुरत होते काय ? या विचाराबरोबर मास्तर बावरले, गोंधळले ते काहीं तरीच शब्द बोलू लागले. बघता बघता नकळत त्याच्या हाताचे वेडेवाकडे चाळे सुरू झाले. पाय थरथर कापू लागले. ओठ फुरफुरूं लागले. डोळा लवूं लागला—दादासाहेबाच्या माडीवर बसलेली छोटी अमला बोट दाखवून म्हणते, " हाच तो ! "...

" हाच तो ! ..."

" हाच तो ! ..."

मास्तराचा धरबंद सुटला. ते समोर पाहूं लागले. तों सारे प्रेक्षक त्याच्याकडे बोटें दाखवून कुजबुजू लागल्यासारखे त्याना दिसले जणू सारे प्रेक्षक त्यांच्याभोवतीं फेर धरून खदखदा हसत नाचत म्हणू लागलें—" हाच तो ! हाच तो ! ..." मग रंगभूमीवर उभे राहणेंहि त्याना शक्य होईना. नाटक तसेच टाकून ते रगपटात घुसले आणि रंगभूमीवर गोंधळ उडाला. प्रेक्षकगृहात हलकल्लोळ झाला. नाटकाचा असा बोजवारा उडालेला पाहून रावसाहेब क्रोधानें रगपटात धावले आणि ओरडले —

" कुठ आहे तो पाड्या ? तरी हजार वेळा मी बजावून सागितल होतं कीं हें काम तुला झेपणार नाहीं, तू ह्या भानगडींत पडू नकोस"...

तेवढ्यात दिग्दर्शक मध्ये पडले आणि त्यानीं रावसाहेबाना आवरलें. नाहींतर रावसाहेब रगपटात घुसून मास्तराच्या मुस्कटात भडकावयाला निघाले होते. मग डाव विस्कटल्यासारखा झाला. सारे प्रेक्षक हीच एक खमग वार्ता अतृप्त मनानें चघळीत चघळीत पांगूं लागले रगपटातल्या नटानीं आपापले रग उतरवले आणि ते घरोघर जाऊं लागले.

मास्तर रगपटात आरशासमोर टेबलावर आपलें मस्तक ठेवून आणि तें हाताने झाकून घेऊन बसले होते त्यांच्याजवळ तुळशी आणि अण्णासाहेब समजुतीचे शब्द बोलत उभे होते. तेवढ्यात मामासाहेब, बयो, आणि जाई

घाईघाईनें तेथें येऊन पोंहोचली. मग मामासाहेब या समजावणीच्या गलबल्यात सामील झाले. बयोहि मास्तराच्या खाद्याला मायेनें स्पर्श करून बरेंच काहींसे म्हणाली. पण मास्तरानीं एकदाहि आपलें मस्तक वर उचललें नाहीं. ते पाहून जाईला भडभडून आले ती रडू लागली रडता रडता तिनें मास्तराना मिठी मारली आणि म्हटलें—

"बाबा, आमच्यावर रागावलात तुम्ही ?"

या उद्‌गाराबरोबर मास्तरानी मस्तक उचललें आणि तिच्याकडे करुणार्द्र दृष्टीनें पाहिलें त्याच्या थिजलेल्या डोळ्यातून घळघळा अश्रू ओघळू लागले. जाईच्या पाठीवरुन आपला कापरा हात फिरवीत ते म्हणाले—

"नाही ग पोरी, तुमच्यावर कसा रागावेन मी ? मी माझ्यावरच रागावलो आहे माझें भाडण तुमच्याशीं नाही, देवाशी आहे त्यान माझ्या मनाला पंख दिले आणि शरीराचे का म्हणून कापून टाकले ? आणि जर कापून टाकायचे होते तर जन्मभर असें खुरडत कशाला ठेवले ? असलें जिणें जगण्यापरीस मेलेलें काय वाईट ?"

मास्तरानी आरशात दिसणाऱ्या स्वतःच्या प्रतिबिम्बाकडे अपरंपार कारुण्यानें पाहिलें. आणि मग त्वेषानें ते म्हणाले—"अस वाटतं कीं हे फुरफुरणारे ओठ ओरबाडून, फेकून द्यावेत, लवणारा डोळा फोडून टाकावा, थरथरणारी बोटें आणि कापणारे पाय छाटून टाकावेत—"

आणि मग मास्तरानीं पुन्हा आपलें मुख थरथरत्या हातानीं झाकून घेतले आणि हुंदके देऊन ते रडूं लागले.

● ● ●

# १७

त्यानंतरचे दोन तीन दिवस मास्तरानाच नव्हे तर घरातल्या साऱ्या माणसाना अत्यंत तापदायक गेले. मास्तराच्या प्रकृतीनें ऐन वेळीं दगा दिल्यामुळें नाटक मधेंच बंद करावें लागलें. याचा गवागवा गावातच नव्हे तर वर्तमानपत्रानी दूरच्या प्रांतापर्यंत केला त्यामुळें जें काही नाटक थोडें-बहुत रंगलें होते, त्याचे श्रेय मास्तराच्या पदरीं पडण्यापेक्षा, अपशकुनी नट म्हणूनच त्याची ख्याति फार झाली. या श्रेयासाठी मास्तर हपापले होते असें नव्हे. कारण त्याचे दुःख वेगळेंच होतें. या दुःखानें त्याची अवस्था भ्रमिष्टासारखी झाली होती वृक्षाला येणारी पालवी कायमची करपून जावी आणि तरीदेखील तो वृक्ष खराट्याचे जिणें कंठीत वर्षानुवर्षे भूमीवर उभा राहावा, तसे उरलेल्या आयुष्यात तिष्ठत उभें राहण्याचें मास्तराच्या नशीबीं आलें होते. या जाणीवेमुळें मरगळलेल्या मनाने दोन तीन दिवस ते घरातच कुढत बसले होते जाईखेरीज ते कुणाशीं बोलले नाहींत. दोन दिवस अन्नालाहि त्यानीं स्पर्श केला नाही. यामुळें घरादाराला उदास अवकळा चढली. पण मास्तरानी केलेला अन्नत्याग कोणाच्या रागातून निर्माण झाला नव्हता. बयोनें, आपण अन्न घेत नाही म्हणून जेवण टाकलें, हें उमजताच मास्तर एकदा बळें बळें पानावर जाऊन बसले

देखील. पण पहिला घासहि त्याच्या घशाखालीं उतरेना. त्याना वारवार झाल्या गेल्या गोष्टीची आठवण येई आणि त्याचे डोळे भरभरून वाहूं लागत. मग जेवण टाकून ते तसेच उठत आणि बाहेर येऊन खिडकींतून कोठेतरी दूरवर नजर लावून बसत.

मास्तरानीं हाय खाल्ली होती. त्याचे कुढणें विकोपाला जाऊं नये म्हणून मामानी बाळूकाकाना मध्यस्थी घालून त्याच्या तोंडून मास्तराची समजूत करविली. पण बाळूकाकाचे समजुतीचे शब्द उपरे आहेत, हें मास्तराच्या तेव्हाच लक्षात आलें बाळूकाका त्याना म्हणाले कीं तम्मण्णाचार्यांचें सारेंच बोलणें काहीं खरें मानण्याची जरूरी नाही. मास्तराना अजूनहि बरें होण्याची पुष्कळच आशा आहे. पण ते काहीं खरें नव्हतें. कदाचित् आशा असेलहि ! तम्मण्णाचार्यांच्या ऐवजीं दुसरा कोणीतरी धन्वन्तरी मास्तराना भेटणें काय अशक्य होतें ? पण नुसते ' बरे होण्याने ' मास्तर फार तर नीटनेटकेपणानें जगूं शकले असते. नुसते नीटनेटकेपणाने जगणें मास्तराना नको होते लुळीपांगळी माणसेहि नीटनेटकेपणाने जगत नाहीं का ? तसलें जिणें मास्तराना क्षणभरहि दुःसह झाले असतें. पण त्याहिपेक्षा अगतिक अशा अनुकंपेच्या जिण्याचा त्याच्या ललाटी शिक्का बसला होता. मास्तर बरें झाले असते तरी विशेषसें काय घडणार होतें ? पुन्हा चुकूनदेखील त्याना कुणी नाटकात काम करण्यासाठी पाचारण करणें शक्य नव्हतें. आपल्याच आवडीच्या क्षेत्रात त्याना परित्यक्तेचे जिणें कठावें लागले असतें. या आणि असल्याच काहीं विचारानीं, फणा ठेचून काढलेल्या नागानें तडफडत शेपटीची आदळआपट करावी तशी मास्तराच्या मनाची अवस्था झाली होती. या दोन तीन दिवसात नाट्यमहोत्सवाकडे ते फिरकले नाहीत. रावसाहेबाच्या घरींदेखील त्यानी पाऊल टाकलें नाही.

मास्तराचें हे कुढें जिणे कोणत्या मर्यादेपर्यंत गेलें असतें तें सागणें कठीण आहे. पण याच वेळी आणखा एक घटना घडली. एव्हाना नाट्य-महोत्सव आटोपत आला होता. शेवटच्या दिवशीं रात्रीं मुलाच्या 'बालध्रुव' या नाटकाचा प्रयोग हाणार होता. झुझारराव पडलेल्या दिवसानतर मास्तराना या नाटकाचा वास्तपुसहि केली नव्हती या नाट्यप्रयोगाच्या दिवशी

सकाळीं कधीं नव्हे ते रावसाहेब लगबगीनें मास्तराच्या घरीं जातीनें आले. मास्तरानी त्याचें आगतस्वागत केले. रावसाहेबानींहि पोषाखीपणानें बऱ्याचशा अवातर गोष्टी बोलण्यात झटकून घेतल्या. मास्तराच्या प्रकृतीची आस्थेवाईकपणे चौकशी करण्यास ते चुकले नाहींत. इतकें सगळें झाल्यावर मग त्यानीं मुद्याला हात घातला. ते म्हणाले की आज रात्रीं पाडू मास्तरानीं नाटयप्रयोगाकडे यायलाच पाहिजे. रावसाहेबाना बाहेर मंडपात बरीच कामे असल्यानें रंगपटात लक्ष घालणें त्याना शक्य होणार नव्हतें. या बाबीवर रावसाहेब भरघोसपणें बरेंच काहींसें बोलले. मग केवळ नाइलाज म्हणून जाता जाता त्यानी एका गोष्टीचा अगदीं सहजगत्या नुसता उल्लेख केला. ते म्हणाले की ही अलीकडची पोरे भारीच फाजील झाली आहेत. नाटकात काम करावयाचें तर त्याला अमुक माणूस इथें पाहिजे आणि तमुक माणूस तेथें असला पाहिजे, त्याखेरीज आम्ही काम करणार नाही, असला हट्ट काय उपयोगी ? परंतु वेळ निभावून नेणें तर जरूर आहे. म्हणून आपण मास्तराच्याकडे बोलावणें करण्यासाठी आलों असल्याचे रावसाहेब घाईनें बोलून गेले खरा प्रकार काय असावा तो मास्तराच्या लक्षात आला. पण त्याचे त्याना विशेष काहीं वाटलें नाही. रावसाहेबाच्या अनेक लब्धप्रतिष्ठित कारवाया त्याना काय आजवर दिसल्या नव्हत्या ? तसें नाही. त्याना सारें समजलें होतें, उमजलें होते. पण रुग्णाईत माणसाला दाखविलेल्या आपुलकीनें तो जसा कोणाचाहि कायमचा ऋणी होतो, तसे मास्तर रावसाहेबानी आपत्कालीं दाखविलेल्या भूतदयेनें त्यांचें अंकित झाले होते. म्हणून मास्तरानीं क्षणभरहि आढेवेढे न घेता होय म्हटलें. मग रावसाहेब महोत्सवाच्या कसल्याशा बैठकीसाठी खुषीत निघून गेले.

मास्तरानीं नाटयप्रयोगाचें सूत्र संभाळण्याचें त्या रात्रीं कबूल केलें याला आणखी एक कारण होतें. तें कारण म्हणजे जाई. त्या दिवशीं सकाळींच जाई मास्तराना म्हणाली होती कीं त्यानीं तिचें नाटक बघण्यास मात्र आलें पाहिजे, नाहीतर आपण देखील नाटकात काम करणार नाहीं. त्यावेळीं तिला नकार देणें मास्तराना मोठें जिवावर आलें. निदान नाटकात काम करणाऱ्या बालगोपाळाच्या प्रेमाचा आदर करण्यासाठीं तरी आपण

जाणें जरूर आहे असें मास्तरानी मनाशी घेतलें. संध्याकाळपर्यंत अशाच काही एक उद्विग्न मनःस्थितीत ते घरी बसून होते. बयो जेवणाकरिता पुन्हा एकदा आग्रह करण्यासाठीं जवळ आली, तेव्हा निमूटपणे ते पानावर जाऊन बसले. नुकतेच मामासाहेबहि महोत्सवाच्या कुठल्याशा चर्चेच्या कार्यक्रमाहून घरीं परत आले होते. मग तेहि मास्तराच्या शेजारीं पानावर येऊन बसले. मामानीं चर्चेंत कोण काय काय बोललें तें सविस्तरपणें सागितलें. एकंदरींत मामासाहेब महोत्सवावर खूष होते. परंतु त्याची चर्पटपंजरी ऐकूनहि मास्तर काही बोलले नाहीत. पानावरून उठून आचवण्यापूर्वी मास्तर मामाना म्हणाले—

" मामा, एक गोष्ट सागायची आहे. आजचा हा प्रयोग संपला म्हणजे मी हें गाव सोडणार आहें. तुमच्या शेतवाडीवर येऊन मी व्यावहारिक कामात तुम्हाला मदत करावी अशी तुमची फार दिवसापासून इच्छा होती ना ? तसंच वागायचं ठरविलं आहें मी."

" होय ! म्हणजे त्याचं असं आहे—नाटकाचा नाद एकंदरींत फारच वाईट. माणसानें तो निग्रहानें सोडण्याचा ठरविलं तरी—"

" माझ्या बाबतींत तरी सोडण्याचा प्रश्नच नाहीं. देवानं तो ठेंचून काढला आहे. आता इथें राहिलें काय आणि जगाच्या पाठीवर कोठेंहि खुरडलें काय, सारखेंच ! "

मास्तराना आवेग आवरेना. ते झट्‌दिशीं उठले आणि आचवण्यासाठीं गेले.

मग जाईला घेऊन ते नाट्यगृहाकडे गेले. रंगपटात जाताच बालगोपाळाची जमलेली गर्दी पाहून त्याचें मन थोडेंसें टवटवीत झालें. मग ते पुन्हा उमेदीनें मुलाना रंगविण्याच्या कामाला लागले. पात्रें रंगविताना त्याचा एक हात थरथर कापत होता. आणि डोळा लवत होता. त्याची मुलानीं बाल—सुलभ वृत्तीनें थट्टा केली आणि तीं हंसू लागलीं. पण मास्तराना त्याचें काही विशेष वाटले नाहीं. मुलें नेहमी अशीच हंसत; पण त्या हंसण्यात कधीं कुत्सितपणा नसे. एखाद्या स्वच्छ जलाशयाचा तळ सूर्यप्रकाशात स्पष्ट दिसावा तसें त्याच्या हसण्यातहि त्याचें निर्मळ हृदय

स्पष्ट दिसे अशा वेळीं मास्तरहि स्वतःकडे पाहून मनःपूर्वक हँसत. पात्रे रंगविण्याचें काम आटोपत आलें. तोंवर नाट्यगृह प्रेक्षकानीं फुलून गेलें होतें. नाटकाची तिसरी घंटा झाली. मखमलीचा पडदा वर गेला. जाईनें प्रवेश केला—आणि त्याच क्षणापासून नाटकाला विलक्षण रंग भरूं लागला.

रंगपटातलें काम आता बहुतक आवरले होते. म्हणून मास्तर रगभूमी-वरील सूत्रें दुसऱ्या कोणाच्या हवालीं करून बाहेर आले. आणि माडवातच मागें कोठें तरी दूरवर एका कोपऱ्यात एकटेच जाऊन प्रयोग पाहूं लागले. जाईचें काम इतकें सहज, लाडिवाळ आणि भावदर्शी होत होतें कीं, माणसें तिच्या शब्दाशब्दाला झुलत होती सारे रस तिच्याभोंवतीं फेर धरून तिचा अनुनय करीत होते. प्रत्येक अंकानतर माणसें तिच्याबद्दल बोलत राहत ह्या मुलीला काही ईश्वराचें देणें आहे असें लोक म्हणू लागले. जाईचें काम पाहून मास्तराचा ठेचलेला हुरूप हळुहळू जागृत होऊं लागला. त्याना वीस वर्षांपूर्वीं घडलेल्या याच नाट्यप्रयोगाची एकाएकीं आठवण झाली. त्यावेळी ध्रुवाचें काम जाई करीत नव्हती, बालनट पाडू त्या भूमिकेंत रंगभूमीवर वावरत होता. त्यावेळीं लोक असेच पाडूच्या शब्दाशब्दावर झुलत राहिले होते. पाडूच्या अभिनयातील सहजता आणि विविध रसावरील त्याची हुकमत पाहून तेव्हाहि लोक असेच म्हणत होते कीं, या पोराला काहीतरी ईश्वरी देणें आहे

तिसरा आणि शेवटचा अक सुरू होण्याच्यापूर्वीं या नाटकाच्या दिग्दर्शनाबद्दल रावसाहेबाचा सत्कार करण्यात आला लंबीचवडी भाषणें झडलीं. रावसाहेबाची हारगुच्छानीं संभावना झाली. मग गहिवरलेल्या शब्दात रावसाहेबानीं लोकाचे आभार मानले, आणि जनतेची अशीच सेवा करण्याचे आश्वासन दिलें. मग हा आगतुक कार्यक्रम संपून शेवटच्या अंकाला आरभ झाला. बालध्रुवाच्या प्रखर तपस्येला भगवान प्रसन्न झाले. साक्षात् भगवन्त समोर अवतरलेले पाहून तपस्वी ध्रुवाची तारांबळ उडाली तपस्यापूर्तीचा आनंद, श्रेयसिद्धीचा हर्ष, बालसुलभ मनाचा उडालेला गोंधळ इत्यादी छटा जाईनें अत्यत सफाईनें आपल्या अभिनयाने साकार केल्या. मग भक्तिभावाने हात जोडून आणि गुडघे टेकून ती म्हणाली—

" देवा, माझ्यासाठी आपण इतके कष्ट घेतलेत ! तुमची उपासना, आराधना, स्तुति मी कोणत्या शब्दात करू ? ऋषीमुनींनीहि तुमचे स्वरूप वर्णन करताना हात टेकले मग माझ्यासारख्या बालकाला तें कसे जमणार ? देवा, मी तुम्हांला शरण आलो आहे. आई म्हणते, कीं शरण गेलेल्या कोणत्याहि माणसाला देव कधीं दूर लोटीत नाहीं देवाना लहान मुले तर फार आवडतात देवा, मग तुम्हीं मला नाहीं का प्रसन्न होणार ? "

हे उद्‌गार जाईनें इतक्या लडिवाळपणें म्हटले कीं जणूं ती भगवन्ताच्या अन्तःकरणाचा ठाव घेत होती या लडिवाळपणें तिनें साऱ्या प्रेक्षकाच्या काळजालाच हात घातला. प्रेक्षकगृहात माणसाच्या ठेचाठेचीत एका खाबाला टेकून पाडू मास्तर उभे होते जाईचा लडिवाळ अभिनय पाहत असताना त्याच्या डोळयात जणू पचप्राण एकवटले होते. जणू आपले दुसरें गोजिरें रूप—आपला आत्माच आपल्या भेटीला परत आल्याचा त्याना भास झाला. हें रूप, हा आत्मा त्याच्या खुरडणाऱ्या दग्धपख देहापेक्षा किती तरी वेगळा होता, कितीतरी सुदर होता. त्या तपस्वी राजकुमाराच्या भूमिकेंतील तिचा अभिनय पाहत असताना क्षणभर ते तल्लिन झाले पण क्षणभरच !

क्षणार्धात त्याची ही तल्लीनता एकाएकी भग पावली. सप्त पाताळात प्रयासाने गाडलेल्या अनेक स्मृति भूकंप व्हावा त्याप्रमाणें रसरसून उद्रेकल्या. जाईच्या तोडचे शब्द, तिचा अभिनय, सभोंवतालचें सारें वातावरण त्याना परिचित वाटू लागले. नुसतें परिचित नव्हे, तर एखाद्या अरण्यातून जाताना वाटसराला वन्य श्वापदाच्या भयसूचक खुणा दिसू लागाव्यात, तशा भयसूचक खुणा त्या वातवरणात उमटलेल्या त्याना दिसू लागल्या. ते घाबरे झाले. गुदमरल्यासारखी त्याच्या मनाची स्थिति झाली. श्वास रोधून ते एकेक शब्द ऐकूं लागले. हा प्रयोग इथेंच सपावा अशी अंतःप्रेरणा त्याना होऊं लागली. नाचत बागडत एखाद्या हरिणीचें पाडस खोल दरीच्या दिशेनें धावूं लागावें, तसें त्याना वाटलें.

बघता बघता पाडू मास्तर भूतकाळात विरघळून गेले. पंचविस वर्षांपूर्वी याच नाटकाच्या प्रयोगात, याच अकात–हाच लडिवाळ अभिनय, हेच लाघवी शब्द, हेंच उत्कट वातावरण, उद्‌गारात तशीच आर्तता–

—बालध्रुव डोळ्यात पाणी आणून भगवन्ताना म्हणतो—

" देवा, आई म्हणते की मुलानी पाप केलें म्हणजे देव त्याना शिक्षा करतो ! खरें ना हे ? मग मला सागा, की मी असे कोणते पाप केलें होतें, म्हणून तुम्ही मला अशी शिक्षा केलीत ? बाबाच्या माडीवर मी बसलो, हाच माझा अपराध होता का ? सुरूचीमातेनें बाबाच्या माडीवरून का मला ढकलून दिले ? माझा असा अपमान का केला ? माझ्या आईला सुरूचीमातेने असे वेडे वाकडे शब्द का बोलावेत ? माझा अपमान मी गिळून टाकला तरी माझ्या आईचा अपमान मी कसा सहन करू ? सागा–देवा सागा, तुम्ही गप्प का ? . "

—याच–नेमक्या याच शब्दावर, रगभूमीवर काम करता करता छोट्या पाडूवर त्या विचित्र रोगाने झडप घातली होती. बोलता बोलता त्याचे ओठ फुरफुरूं लागले, डोळा लवूं लागला, शब्द अडखळू लागले, हाताचीं बोटें वेडीं वाकडी होऊं लागली, आणि पाय थरथरू लागले. त्याचा तो विचित्र अवतार पाहून छोटी अमला रगपटातूनच किंचाळली- " दादा, दादा . "
आणि—

—तेवढ्यात पाडू मास्तर भानावर आले रंगभूमीकडे ते नीट न्याहाळून पाहूं लागले. जीवाचा कान करून ते ऐकू लागले. जाई म्हणत होती—

' देवा आई म्हणते की मुलानी पाप केलें म्हणजे देव त्याना शिक्षा करतो—खरें ना हें ? मग मला सागा "

ते उद्गार ऐकताच मास्तर थरथरूं लागले. त्याचें ओठ फुरफुरूं लागले. बोटें वेडींवाकडीं होऊं लागलीं. ओरडून जाईला 'थाब' म्हणावें, या जीवघेण्या क्रीडेपासून तिला दूर दूर सुरक्षित स्थळीं उचलून न्यावें, अशी त्याना उबळ आली पण तेवढ्यात सबंध प्रेक्षकगृह उलटें पालटें फिरू लागल्याचा त्याना भास झाला. त्यानीं डोळे मिटून घेतले, आणि तोल सावरण्यासाठीं खांबाला घट्ट धरून ठेवलें.

ते भानावर आले आणि सांवरून आजूबाजूला पाहूं लागले, तेव्हा नाटक संपलें होतें. गर्दीची पागापाग होऊं लागली होती जो तो जाईच्या अभिनय कौशल्याची तोंड फाटेपर्यंत तारीफ करीत चालला होता. जाईशिवाय प्रेक्षकाना बोलण्याला जणूं दुसरा विषय नव्हता बरेचसे प्रेक्षक रंगपटाच्या बाहेर जाईला पहाण्यासाठीं थोप गर्दी करून उभे होते. क्षणभर मास्तराना काय झालें तेच कळेना. मग जाईच्या स्तुतीचे, कौतुकाचे शब्द पुष्पवृष्टी-प्रमाणें त्याच्या कानावर सारखे बरसू लागले. त्यावेळीं त्यांच्या हर्षाला पारावार राहिला नाही चाचपडत, माणसाना ठेंचकळत, गर्दीतून वाट काढत, जाईला भेटण्यासाठी मास्तर रंगपटाकडे जाऊं लागले. पण त्याना सरळपणें वाटही मिळेना. धक्काबुक्की करणारे पागल झालेले षोकिन मास्तराच्यावरच डाफरू लागले, त्याच्याशी तणतणूं लागले. पण लोकाचे अपशब्द मास्तराना थोडे सुद्धा खुपले नाहींत. रंगपटाच्या दारात रेटारेटी करत मास्तर कसेबसे येऊन पोहोचले. त्यावेळीं जाईभोवतीं बडे पाहुणे कोंडाळें करून उभे होते. अमलादेवी जाईला कडेवर घेऊन उभ्या होत्या, लडिवाळपणें तिचे कौतुक करीत होत्या. रगपटाच्या दारात मास्तराना उभे असलेले पाहताच जाईनें उचंबळून येऊन " बाबा " अशी हाक मारली. त्याबरोबर छानछोकीच्या पोषाखातील माणसे वळून पाहूं लागली. अमलादेवी चकित होऊन एकदा पाडूमास्तराच्याकडे आणि एकदा जाईकडे निरखून पाहू लागल्या तेवढ्यात जाईनें अमलादेवीच्या कडेवरून चटकन् खालीं उडी मारली. लोकानीं तिला वाट करून दिली. जाईनें धावत जाऊन मास्तराना मिठी मारली.

—आणि मग मास्तरहि उचंबळून आले. गहिंवरून आले, सयमाचे सारे बांध ढासळून पडले. जाईला उचलून मास्तरानीं पोटाशीं घेतलें. त्याच्या

डोळयातून अश्रूच्या सरी ओघळूं लागल्या. त्याचे हातपाय थरथरत होते बोलण्यासाठी ओठ फुरफुरत होते पण त्या तशा अवस्थेतहि जाईचे सारें अगांग त्यानीं चाचपून पाहिले. तिचे डोळे लवत नव्हते. तिचें ओठ फुरफुरत नव्हते. तिच्या हाताची बोटें वेडे वाकडे चाळे करीत नव्हतीं, कीं तिचे पाय थरथरत नव्हते. पुनःपुन्हा तिचे अंग चाचपून ती सुरक्षित आहे याची मास्तर खात्री करून घेत होते त्याची खात्री पटली आणि मग ते कसल्यातरी अनामिक उन्मादानें बेहोष झाले. कसल्यातरी अवर्णनिय उल्हासाची त्यांना धुंदी आली. आणि त्याचें पागळें शरीर कोणत्या तरी अकल्पित साक्षात्काराने बहारून आले

—आणि मग मास्तरानीं जाईला खांद्यावर घेतलें आणि या उन्मादात ते रंगपटात आणि प्रेक्षकगृहातहि थयथया नाचू लागले. जमलेले सारे लोक विचित्र दृष्टीने त्यांच्याकडे पाहू लागले. पण त्याची मास्तरांना आता तमा नव्हती, ते निराळयाच सृष्टीत भ्रमण करीत होते. वेगळयाच विश्वात वावरत होते. श्रेयसिद्धीच्या ढगावर जणू ते तरंगत होते—

—जणूं मास्तरांना पुन्हा भारद्वाज पक्ष्यासारखे सुंदर, सोनेरी आणि सजीव पंख फुटले होते !

• • •

लेखनकाल—
१ फेब्रुवारी ते ५ मार्च १९५३ }